गोदातटींचा

# गुंजारव



(श्री क्षेत्र नाशिक येथील कविकवयित्रींच्या
निवडक कवितांचा संग्रह)

हा ग्रंथ

महाराष्ट्र-वाङ्मय-मंडळ, नाशिक

या संस्थेमार्फत तयार झाला.

(पुस्तक दुसरें)

आवृत्ति १ ली

किमत १ रुपया

१९३०

मुद्रक:—अनंत आत्माराम मोरमकर,
श्री लक्ष्मी-नारायण प्रेस, ३६४ ठाकुरद्वार, मुंबई नं. २.

आर्या

॥ गोदातट कविषट्पद गुंजारव हा प्रमोद रसिकांला ॥
॥ वितरो ! हितगुज जैसें दे एकांतीं नवोढ तरुणांला ॥

दा. ग. पाध्ये.

प्रकाशक: —श्रीयुत एकनाथ यादव निफाडकर,
चिटणीस, महाराष्ट्र-वाङ्मय-मंडळ, नाशिक.

# प्रस्तावना



मनुष्यमात्राच्या जन्माला नऊ महिने लागतात. आमच्या या "गोदातटींच्या गुंजारवाच्या" गर्भावस्थेचा काळ त्याच्या सुमार पाऊणपट झाला. त्याची मूळ-कल्पना गेल्या विजयादशमीच्या सुमारास माझे मित्र रा. नाथ निफाडकर यांच्या मनांत प्रादुर्भूत झाली. तिची फलद्रूपता येथील महाराष्ट्र-वाङ्मय-मंडळ नांवाच्या संस्थेमार्फत व्हावी असें ठरवून घेऊन, त्या कार्यी मीं सहकारित्व करावें अशी त्यांनीं मजपाशीं मागणी केली. त्यांना नकारार्थी उत्तर देणें शक्य नव्हतें. एक तर हें सरस्वती देवीच्या सेवेचें काम. त्यांत भाग घेणें हें तिच्या प्रत्येक खऱ्या भक्ताचें कर्तव्य; व तें करण्यांत स्वतःच्या उदासीनतेला व तद्वतच खास बेबनांवाला, पक्षभेदाला किंवा व्यक्तिभेदाला अवकाश नसावा. दुसरी महत्वाची गोष्ट ही कीं, निफाडकर व त्यांचें मंडळ या दोहोंचीही सत्पात्रता मला पटली होती. कर्तत्ववान् वाङ्मय-भक्त म्हणून, कवि व गद्यलेखक म्हणून, निफाडकरांची महाराष्ट्रांत, विशेषतः खानदेश, नगर व नाशिक या तीन जिल्ह्यांत पसरलेली ख्याति मला, मुंबई-हून नाशकास आल्यावर लौकरच, कळलेली होती. रा. गो. श्री. जोशी यांसह वर नामनिर्देश केलेल्या महाराष्ट्र-वाङ्मय-मंडळाचे ते जनक असून ती संस्था जीववंत व कर्तृत्ववंत ठेवण्यासाठीं ते अहर्निश झटत होते तें मला ठाऊक होतें. त्या संस्थेशीं विशिष्ट व संमानदायी रीतीनें संबद्ध होण्याविषयीं त्यांनीं पूर्वी केलेली एक विनंति मीं अमान्य केली होती. दुसरी विनंति तशीच अवमानणें मला फार जड वाटलें. त्यांत सुजनता तर नसतीच, पण तेणेंकरून गुणग्रहण-तत्परतेचा अभाव मात्र दृष्टीस येता. कारण १९२८ सालीं काव्यमंडळ या नांवानें स्थापन झालेल्या व पुढें नांव बदलून महाराष्ट्र-वाङ्मय-मंडळ म्हणून प्रसिद्ध झालेल्या या वाङ्मय-सेवकांच्या संस्थेच्या अल्पकालीन कारकीर्दींत तिच्यामार्फत जो कामगिरी

बहून आली आहे, ती गुणानें व विस्तारानें प्रशंसा करण्यास फार योग्य अशी आहे. संस्थेनें आपला कार्यारंभ एक लहानसा कविताग्रंथ दत्तक घेऊन केला. पुढें सुमारें ६० जाहीर सभा भरवून तेथें व्याख्यानें, लेखवाचन, वादविवाद इत्यादि कार्यक्रम यशस्वी रीतीनें तडीस नेला. काव्यगायनासाठीं खासगी बैठकी झाल्या त्या निराळ्या. शिवाय, बऱ्याच विस्तृत प्रमाणावर गोदातटनिवासी कविकवयित्रींचें संमेलन भरवून त्याचीं वार्षिक अधिवेशनें होण्याची व्यवस्थाही मंडळानें केली आहे. मंडळानें आपल्या वाङ्मय विषयक कामगिरीचें क्षेत्र अन्य रीतीनें विस्तृत केलें आहे. त्याचें एक परस्परोपयोगी पुस्तकालय " **शारदाग्रंथसंग्रह** " या नांवें विद्यमान आहे. **विनायकमंडळ** म्हणून त्याची एक शाखा धरणगांवीं असून तिचा व्यवसाय मोठ्या जोमानें चालू ठेवण्याचें श्रेय चिटणीस श्रीमती शांतादेवी परदेशी या गुणवंत पण विनयसंपन्न विदुषीकडे आहे. संस्थेचें एक विशिष्ट स्वरूप असें आहे कीं, नियमनिबंधादि बाह्योपकरणांपेक्षां दृश्य व विविधस्वरूपी अशी वाङ्मयसेवा घडवून आणण्याकडे तिचें लक्ष अधिक वेधिलेलें असून, द्रव्यकीर्त्यादींची अपेक्षा न करणारे पुष्कळसे सरस्वतीभक्त तिनें आपल्या कक्षेंत प्रत्यक्षाप्रत्यक्ष रीतीनें, कांहीं ऋजु भक्तीनें तर कांहीं विरोधभक्तीनें असे गोंविलेले आहेत. अशा संस्थेच्या मार्फत दक्षिणेंत अत्यंत पवित्र मानलेल्या गोदावरीच्या तीरावर, नाशिक पंचवटीसारख्या पुराणप्रसिद्ध क्षेत्रीं विहार करणाऱ्या कविकवयित्रींच्या निवडक कवितांचा संग्रह छापून प्रसिद्ध करण्याची शुभमंगल योजना व्हावी, व तिजला मूर्त स्वरूप देण्याच्या कार्यीं प्रमुखतेनें भाग घेण्याविषयीं मला निमंत्रण व्हावें, हें एक प्रकारचें सुभाग्यच मला वाटलें, व नाथ निफाडकरांच्या विनंतीस मीं मोठ्या आनंदानें रुकार दिला. योजिलेल्या कार्यास लगेच सुसंघटित स्वरूप देण्यांत आलें व काम करण्याची रूपरेखा नक्की करण्यांत आली. आमचा हा उपक्रम मोठ्या शुभशकुनी मुहूर्तावर झाल्याचें परिणामीं दिसून आलें.

अलीकडे छापून प्रसिद्ध होणाऱ्या महाराष्ट्र-वाङ्मय-ग्रंथांत एक नवीन तऱ्हेचा कवितासंग्रह छापण्याचा प्रकार पुष्कळसा प्रचारांत येत आहे. एकाच कवीचीं गीतें छापून काढणें ही पुराणप्रचलित रीति. "नवनीता-" सारखे, आजपर्यंत होऊन गेलेल्या सर्व सुप्रसिद्ध आणि प्रतिभाशाली कवींच्या निवडक कवितांचे संग्रह संकलित करणें ही दुसरी रीति. नवी रीति म्हटली म्हणजे कांहीं विशिष्ट युगशतकादिकांची किंवा देश, प्रांत, वा नगर इत्यादि स्थलविषयक अशी मर्यादा घेऊन तींत समाविष्ट होणाऱ्या प्रसिद्धाप्रसिद्ध कवींच्या निवडक कवितांचा संग्रह छापविणें ही "द्विदळ," "त्रिदळ" यांसारखीं कुटुंबमर्यादेनें अंकित झालेलीं कवनें प्रसिद्ध करणें ही अगदीं नवी टूम. ह्या नव्या तऱ्हेच्या रूपरेखांच्या कवितासंग्रहांची सामान्य तरफदारी करणें किंवा त्यांची विविध उपयुक्तता सांगणें कठिण नाहीं. एक तर, ह्या नव्या रीतीनें महाराष्ट्रांत होत असलेल्या विद्याविषयक प्रगतीचा अजमास स्पष्टपणें मिळतो. आमच्यांत सध्यां वाङ्मयाचा व्यवसाय, कविता करण्याची हौस, कविसंघप्रवृत्ति इत्यादि अभिनव गोष्टींत कशी प्रगति होत आहे व त्याबरोबरच जनतेंत कवींच्या कृतींचें सन्मानभक्तिपूर्वक गौरव करणारी सुजनता व त्यापासून आनंद मिळविणारी रसिकता, ह्यांत उत्तरोत्तर कसा अधिकाधिक उत्कर्ष होत आहे, हेंही आपणांस ह्या नव्या तऱ्हेच्या पुस्तकांवरून दिसून येतें. दुसरी महत्त्वाची गोष्ट ध्यानांत घ्यावयाची ती ही कीं, अशा नव्या तऱ्हेच्या कवितासंग्रहांनी आमच्या महाराष्ट्र वाङ्मयांत महत्त्वाची भर पडते, यांत संशय नाहीं. जुन्या कवींच्या आवडीचें खरें, खोटें मिष करून आमच्या नव्या कवींची टवाळी करणारे आकाशसंचारी लोक आमच्यांत अजूनही सांपडतात. क्षणभर असें कबूल करूं या कीं, आमच्यामध्यें प्रचंड किंवा अद्वितीय गुणतेचा ग्रंथसमूह लिहिणारे महाप्रतिभाशाली कवि, पूर्वीं होऊन गेले. त्यांच्या तोडीचे, किंवा त्यांच्या बरेचसे जवळ जाऊं शकणारे कवि आमच्यांत आज नाहींत, किंवा या पापी व परराज्यी

कालांत निपजूंही शकणार नाहींत. पण आजकालच्या महाराष्ट्रांत कविता" देवी केवळ निद्रावश किंवा मुकी झाली आहे, असें "स वै मुक्तोऽथवा पशुः" या कोटींत न येणारा कोणीही साक्षर मनुष्य म्हणणार नाहींसें वाटतें. उलट आमच्यांतील कवितादेवीचा आधुनिक अवतार, गोकुळीं श्रीकृष्णानें केली तशी स्वैर आणि विविध करणी करून जनमनें मोहवीत आहे, व ती अधिकाधिक प्रगल्भ व मनोहारी स्वरूप धारण करीत असल्याचीं अनेक चिन्हें दृग्गोचर होत आहेत. म्हणून कालिदास, भवभूति, ज्ञानेश्वर, मोरोपंत इत्यादि पूर्वकालीन प्रतिभावंत कवींच्या कृतींचे प्रत्येकीं निरनिराळे ग्रंथ छापून प्रसिद्ध करण्यास जितकी जागा आहे, तितकीच एकाहून अधिक आधुनिक कविकवयित्रींच्या—सार्थ रीतीनें कविकवयित्री ह्या नांवास पात्र असणाऱ्या व्यक्तींच्या निवडक कवितांचा संग्रह प्रसिद्ध करण्यास आहे. हिमालय तो हिमालय, पण कित्येक समुद्रपृष्ठाहून फारसा उंच नसलेल्या प्रदेशांत "ग्लेशिअर," "आइसबर्गा"दि हिमगिरी तयार होतात व कुतूहलयोग्य तेज, ओज व प्रभाव दाखवितात. रवि-शशि ते रवि-शशि. पण आपण दिवाळींत रात्रीचा दिवस करणारा दीपोत्सव थाटतों व अनेक शुभमंगल प्रसंगीं केवळ "दिवाळी" करतोंच; आणि तीही आबालवृद्धांस रंजवील इतक्या प्रमाणावर आपणांस करतां येते. तद्वतच, रसिकांनीं सकौतुक हातांत घ्यावेत व महाविद्वज्जनांनींही नाकें न मुरडावींत अशा तऱ्हेचे स्थलकालमर्यादित कवितासंग्रह करणें व सरस्वतीभक्त जनतेस सादर करणें शक्य व उपयुक्त आहे. अर्थात् अशा तऱ्हेची वाङ्मयसेवा देवी सरस्वतीला मान्य होण्याला अटी आहेत. कोणत्या कवितांचा संग्रह करावयाचा ह्याविषयींची स्थलकालमर्यादेची इयत्ता ठरविणें, त्यांत येणाऱ्या कविकवयित्रींची निवड करणें व त्यांच्या कृतींतील संग्रहणीय कविता वेंचून काढणें, हीं सर्व कामे मोठ्या चतुरतेनें, वाङ्मयसेवेच्या उच्च ध्येयानें, समानुभूतिपूर्वक पण गुणैकग्रहण दृष्टीनें झालीं पाहिजेत. वाङ्मयांत भर घालावयाची

ती जितकी महत्त्वाची करतां येईल तितकी करणें—सरस्वतीदेवीला नव अलंकार तयार करणें तो जितका चटकदार व सफाईचा करितां येईल तितका करणें, हाच हेतु संग्रह करणाऱ्यांच्या मनांत प्रधान असला पाहिजे. खासगी पक्षपात किंवा हौस यांचें पुरें नियंत्रण झालें पाहिजे. तरच होणारा संग्रह अभिनंदनार्ह होईल.

आमचा **गोदातटींचा गुंजारव** संकलित करतांना या सर्व गोष्टी पूर्णपणें लक्षांत ठेविल्या होत्या. आम्हीं प्रथम जो स्थलकालमर्यादा ठरविली कीं, ह्या ग्रंथांत सध्यां **नाशिक पंचवटींत** असणाऱ्या सर्व कवि–कवयित्रींच्या, आणि तितक्यांच्याच कवनगीतांचा समावेश करावयाचा, ती परिणामीं आम्हांला शहाणपणाची अशीच दिसून आली. ठरलेल्या कक्षेंत समाविष्ट होऊं शकणाऱ्या कांहीं अति अल्पसंख्याक कवि–कवयित्रींनीं ह्या प्रयत्नांत सामील होण्याचें कांहीं विशिष्ट कारणासाठीं नाकारलें. तरी आम्हांस हवें होतें त्याहुन संख्येनें अधिकच असें सहकारी कविमंडळ आणि तेंही प्रेमानंदानें जोडलेलें असें आम्हांस साधतां आलें. गुणाच्या दृष्टीनें **नाशिक पंचवटीनें** आपली पुराणेतिहासप्रसिद्ध कीर्ति पुरेपणीं राखिली. नाशिकचें वातावरण काव्यमय किंवा काव्यस्फूर्तीस अद्यापिही अनुकूल असें आहे. येथील गोदावरीचा लहान पण मनोहारी प्रवाह, पात्राच्या दुतर्फा थाटून गेलेल्या देवालयांच्या रांगा, शहराच्या आसपास पसरलेल्या पर्वतश्रेणी, पावसाळ्यांतील जलबाष्पपवनादींची स्वच्छंद नृत्यगीतें, श्री रामचंद्र व सीतादेवी यांच्या चरणसंसर्गाचा अद्यापि जिवंत आहेसा दिसणारा प्रभाव, ह्या सर्व गोष्टी लक्षांत घेतां, **एकनाथ, मुक्तेश्वर, निरंजन माधव** इत्यादि प्रतिभाशाली संतकवींच्या या मायभूमींत, आजही गौरवास व कौतुकास पात्र असे कवि व कवयित्रीही सांपडाव्यात यांत नवल नाहीं. ह्या सर्वांचें आम्ही **नाशिक–**

पंचवटीचें "कविमंडळ" जुळविलें व सभा भरवून, ऊहापोह करून "गोदा-तटींच्या गुंजारवा"च्या योजनेस त्यांची संमति मिळविली. पुस्तकाच्या हेतुस्वरूपाच्या दिशा नक्की ठरवून, तदनुरोधानें आपापणांस आवडणाऱ्या व पुस्तकांत संग्राह्य अशा योग्यतेच्या दिसणाऱ्या कविता धाडून देण्यासाठीं सर्व कविकवयित्रींना विनंति करण्यांत आली. ग्रंथासाठीं एक संपादक-मंडळ नेमण्यांत येऊनः यांनीं आलेल्या कवितांची रसमाधुरीआदींकडे लक्ष देऊन, सुप्रमाणतेचे अनुसारें पुनश्च निवडानिवड करून, ह्या पुस्तकांत संग्रहित करावयाच्या कविता निश्चित केल्या. कांहीं तरी अभिनवता किंवा चारुता असल्याशिवाय कविता घ्यावयाची नाहीं असा निश्चय करून त्याप्रमाणें निवड केली. निवडलेल्या कवितांतही सर्वानुमतें इष्ट ते फेरफार, कान्हा-मात्रादि दोषांचें निराकरण, शेवटची सफाई व जिल्हई इ. करण्याचा अधिकार बजावण्यास देखील ही संपादक-मंडळी विसरली नाहीं. महत्त्वाची गोष्ट सांगितली पाहिजे ती ही कीं, संपादकांनीं केलेले असे हे फेरफार फारच थोडे असून, कविकृतीच्या मूळस्वरूपांत जाणवेलसा फरक न होण्याविषयीं फारच आस्था बाळगण्यांत आली आहे. सारांश, गुंजारवांतील कवितांस जितकें प्रगल्भ स्वरूप देणें शक्य होतें तितकें देऊन मग त्या त्यांत समाविष्ट केलेल्या आहेत.

वर निर्दिष्ट केलेल्या संपादक-मंडळाचे घटक चार होते. एक रा. पां. गं. लिमये, दुसरे रा. वि. ना. ऊर्फ बाबासाहेब वाड, तिसरे रा. नाथ निफाड-कर व चौथा मी स्वतः. संपादक-मंडळाची कामगिरी फारच महत्त्वाची व परिश्रमाची झाली. ह्या कामीं माझ्या तीन सहकारी संपादकांनीं फार मूल्याचें साह्य फारच तत्परतेनें दिलें याबद्दल मी त्यांचे गुण मोठ्या आनंदानें घेतों. संपादकत्वादिकामीं रा. र. ग. जोशी ( पद्मविहारी ) यांनींही फार मदत केली. त्यांचेही आभार मानले पाहिजेत.

गुंजारवांत समाविष्ट केलेल्या कवितांचें वर्गीकरण करून त्या निरनिराळ्या भागांत विभागिल्या आहेत. हें वर्गीकरण कांहीं तर्कशास्त्रीय एकतत्त्व विभंजक पद्धतीनें केलेलें नाहीं. कित्येक कवितांचा प्रधानगुण रसांत व कित्येकांचा विषयांत असतो. म्हणून रस आणि विषय ह्या दोहोंच्या संयुक्त अनुरोधानें पुस्तकाचे भाग केले असून प्रत्येक भागाचें स्वरूप सांगितलें आहे. शिवाय एक अनुक्रमणिका कवितेचें नांव व पृष्ठ अनुक्रमें दाखविणारी अशी नेहमींच्या पद्धतीची व दुसरी एक कवींच्या नांवांची दिली आहे, व प्रत्येकाच्या कवितेची क्रमिक संख्या व पृष्ठसंख्याही पुढें सांगितली आहेत. या योजनेनें वाचकांना आपला आवडता कवि किंवा विषय सहजीं काढतां येईल व तेणेंकरून पुस्तकाचें वाचन,व पर्यालोचन अधिक सुकर व मनोधारक होईल अशी आशा आहे.

आमच्या या **गुंजारवास** अनेक दृष्टीनें प्रतिनिधिक स्वरूप प्राप्त झालेलें दिसून येईल. एक तर, ह्यांत ज्यांच्या कविता संग्रहीत केल्या आहेत, त्यांची संख्या ३६ आहे. त्यांत ३१ कवि व ५ कवयित्री आहेत ही सर्व मंडळी सध्यां नाशिक-पंचवटींत राहते हें खरें, पण त्यांपैकीं पुष्कळांचा जन्म नाशिकबाहेर झालेला असून बरेच येथें कामधंद्यादीच्या निमित्तानेंच आले आहेत. सर्वांचें जन्मस्थान व मुख्य वसतीचें गांव दाखवावयाचें असेल तर बहुतेक सर्व मुंबई इलाख्याचा नकाशा काढावा लागेल. गुंजारवांत प्रतिबिंबित झालेलें कवि-कवयित्री-मंडळ अन्य रीतीनेंही पुष्कळ विविध व विस्तृत आहे. त्यांत दोन कवयित्री मुलीच आहेत.दोघे बाल-कवि कॉलेजांत शिकत आहेत, दोघेतिघे अद्यापि संसारांत सांगोपांग रीतीनें शिरलेले नाहींत. बाकीच्या मंडळींत कांहीं नव्या जोमाचे उत्साही तरुण व कांहीं पन्नाशीजवळचे वयोवृद्ध, तपोवृद्ध, मानवृद्ध गृहस्थ असून, एकादा मजसारखा परमेश्वरसंनिधि लवकर मिळेल अशी अपेक्षा करणारा महाराष्ट्र भाषेच्या प्रगतीचा आनंदी निरीक्षक आहे. शिवाय आमच्या ह्या ३६ कवींत हिंदी समाजांतील सांप्रतचे बहुतेक धंदेव्यवसाय मुद्रित झालेले आहेत. यांत डॉक्टर आहेत, प्रोफेसर, हेड-

मास्तर आहेत, मुखवस्तु विद्याव्यासंगी आहेत. व्यापारी आहेत–फार काय खादीच वापरणारे व खादीचाच व्यापार करणारे असे आहेत. आणखी एक विशेष नोंद करण्यासारखी अभिनवता आमच्या या गुंजारवांतील कवि-मंडळांत आहे. वाचकांस विदित आहे कीं, कित्येक कवि काव्यलेखन-प्रकाशन हा जणों धंदाच करणारे, मजसारखे, आहेत. दुसरा एक वर्ग कविता करणारा पण विनयामुळें किंवा टीकेच्या भयामुळें त्या न छापवून घेणारा असा आहे. योग्यतेने कमी नाहीं असा तिसराही एक वर्ग माझ्या ओळखीचा बराच मोठा आहे. तो वर्ग फक्त खासगी मनोविनोदासाठीं गुणगुणारा व शाश्वत नाहीं म्हणून कविता लिहून ठेवणारा असा आहे. आपल्या कविता छापाव्या ही कल्पनाच त्यांनीं गंभीरतेनें विचारीं घेतलेली नसते. आमच्या कवि–मंडळांत ह्या तिसऱ्या तऱ्हेचेही कवि आहेत. कवयित्री बहुतेक ह्याच वर्गातल्या असावयाच्या.ह्या वर्गांतील कविकवयित्रींस गुंजारवानें पडद्याबाहेर आणिलें याबद्दल तो कविताप्रेमी जनांच्या विशेष आभारास पात्र आहे.

सारांश, गेल्या पन्नास वर्षांत महाराष्ट्र कवि व कविता ह्यांच्यांत कोण-कोणच्या रीतीनें पाऊल पुढें पडलें आहे, विशेषत: ध्येय, भाषा, प्रतिपादन-पद्धति इत्यादि संबंधीं कसकसे फेरफार घडून आले आहेत व वाङ्मयाच्या ह्या महत्त्वाच्या भागांत कसकशी प्रगति घडून आली आहे याचा अजमास आमच्या या गोदातटींच्या गुंजारवावरून काढतां येईल. कारण, यांत जुन्या कवितापद्धतीस चिकटून राहणारे, भाषा–वृत्त–विषय इत्यादिसंबंधीं विशेष चिकित्सक असे कवि आहेत, तसेच नव्या दमाचे व जोमाचे, विवेचन-पद्धति भाषादिविषयीं पूर्ण स्वातंत्र्यवादी, वृत्तविषयादीत अभिनवतेचे पुढारी व क्रांतीचे भक्त असेही आहेत. ह्या दोन टोंकांस असणाऱ्या अंतिम बिंदुस्थ शाळांच्या दरम्यान ठेवण्यासारखेही कवि आहेत. त्या सर्वांचे प्रतिनिधि, आणि तेही विश्वस्त व नांवाजलेले असे प्रतिनिधि ह्या पुस्त-कांत सांपडतील सारांश, ह्या पुस्तकांतील कवितांच्या संकलनांत दुराग्रह किंवा एकपक्षीयतेस वाव न देतां सहानुभूतिपूर्वक गुण-

संग्रहणतेचाच अधिक प्रभाव होऊं दिला आहे. विविधतेनें येणाऱ्या मनोरंजकतेचा अव्हेर केला नाहीं व अतिरेकही केला नाहीं, सारांश, हा कवितासंग्रह जितका बोधक व मनोरंजक आणि सांप्रतच्या कालविचार-ध्येयादींचा निदर्शक करतां येईल तितका करण्याविषयीं प्रयत्न केला आहे. आमचा प्रयत्न कितपत सिद्धीस गेला आहे हें वाचक ठरवितील. प्रत्येक वाचकास आमच्या सर्व कविता पसंत वाटतील अशी अपेक्षा करण्यापुरते आम्ही महत्त्वाकांक्षी नाहीं; पण आम्हांस असा आत्मप्रत्यय वाटतो, कीं हें पुस्तक वाचणारा कोणीही असो-तो कोणत्याही शाळेचा, विचार- शाखेचा, मताचा वा वयाचा असो, पण त्या प्रत्येकाला त्याच्या त्याच्या विशिष्ट रुचीच्या अनुसारें रंजवील असा एक तरी भाग गुंजारवांत कोठें ना कोठें तरी सांपडेलच सांपडेल.

पुस्तकांत संग्रहीत झालेल्या १३८ कवितांच्या मथळ्याशीं प्रत्येकीच्या कर्त्या कविकवयित्रीचें नांव दिलें आहे. त्याशिवाय अधिक माहिती " कवि-परिचयादि " नांवानें देतात तशी ह्या पुस्तकांत दिली नाहीं, ती मुद्दामच. आमचा हेतु हा कीं, वाचकांनीं कर्ता कोण ह्याविषयीं मन शून्य ठेवून कविता वाचाव्या. धंदा, वय, सामाजिक पदवी यांकडे त्यांचें ध्यान जितकें कमी जाईल तितकें चांगलें. हा उद्देश शक्य तितका साधण्याविषयीं यत्न केला आहे.

गैरसमज होऊं नये म्हणून एका गोष्टीविषयीं थोडासा उल्लेख केला पाहिजे. नासिक येथें दुसरी एक वाङ्मय-संस्था वाङ्मय-विहार-मंडळ म्हणून आहे. मी स्वत: तिचाही सभासद आहें. तिच्या मार्फत नासिक येथील कवि-कवयित्रींच्या कवितांच्या संग्रहाचें सुमारें १०० पानांचें पुस्तक "माधवी" या नांवानें गेल्या जानेवारींत छापून प्रसिद्ध झालें आहे. एकाच शहरांतील कवि-कवयित्रींच्या गीतगायनांचे दोन निरनिराळे संग्रह दोन चार महिन्यांच्याच अंतरानें छापून प्रसिद्ध होतात हें एक तऱ्हेचें कोडेंच पर-स्थांस वाटेल. ह्या संबंधींचा विस्तृत ऊहापोह करण्याची जरूरी नाहीं. इतकें मात्र सांगणें इष्ट वाटतें कीं, गुंजारवाची योजना "माधवी"च्या

योजनेच्या बरेच अगोदर झालेली होती. दोन्ही योजनांचे हेतु, ध्येय इत्यादि प्रभिन्न होते. बरेचसे कवि दोन्ही पुस्तकांत सारखेच अवतरले आहेत. कांहीं एकांत नाहींत तर कांहीं दुसऱ्यांत नाहींत. ही एकपरी इष्टच गोष्ट होय. कारण, या योगें दोन्ही पुस्तकांत विशिष्ट भिन्नता साधली आहे. गुंजारवाचे प्रवर्तक " माधवी"चें शुभच चिंतितात.

शेवटीं आभार मानावयाचे ते श्री लक्ष्मी-नारायण छापखान्याचे मालक व व्यवस्थापक माझे स्नेही रा. मोरमकर व रा. तटणीस यांचे. त्यांनीं पुस्तकाची उठावणी फार सुंदर करून दिली आहे. प्रुफें तपासण्याचे कामीं रा. विठ्ठल जि. नाडकर्णी यांनीं फार मदत केली. तरी कान्हामात्रादींच्या थोड्याबहुत चुक्या राहिल्या आहेत त्या मुंबई व नासिक हीं शहरें निरनिराळीं, पोस्टानें प्रत्युत्तर देण्यास ३, ४ दिवस लागण्याइतकीं दूर यामुळेंच. अर्थ समजण्यास कठीण पडेल अशाच चुकांचें शुद्धिपत्र नेहेमींच्या धर्तीचें दिलें आहे त्यांतील एका शुद्धीकडे विशेष लक्ष ओढणें इष्ट आहे. ती ही:– पृष्ठ ९६ कविता ६५–'अश्रुसिंचन" नांवाची, तिची पहिली ओळ " मूर्ति प्रभाकराची न पुनः दिसावयाची " अशी वाचावी.

आमच्या या गुंजारवाची जन्मादिविषयक कहाणी सांगून तो ग्रंथ महाराष्ट्रांतील वाङ्मयप्रेमी रसिक बंधुभगिनींपुढें प्रेमानें सादर केला आहे. ही वाङ्मयसेवा त्यांस आणि श्री सरस्वती देवीस मान्य होवो.

मुखपृष्ठावर लिहिल्याप्रमाणें हें पुस्तक महाराष्ट्र-वाङ्मय-मंडळामार्फत छापविलें जाणारें दुसरें पुस्तक होय. तिसरें पुस्तक रा. नाथ निफाडकर व त्यांची पत्नी यांचें लघुकथांचें " मानारच आखात " या नांवाचें छापलें जात आहे.

दा. ग. पाध्ये
अध्यक्ष—महाराष्ट्र-वाङ्मय-
मंडळाचें कविमंडळ.

नाशिक,
ता. १९ एप्रिल १९३०.

*

# अनुक्रमणिका, नं. १

## कवितांची

## भाग ५—मुरलीगीतें



## भाग ६—करुण



## भाग ७—सृष्टि व सृष्टिसौंदर्य

भाग ११—**वीर.**



भाग १२—**जग** आणि **जीवित.**

भाग १३—**विविध.**





# अनुक्रमणिका नं. २.

## कवि व त्यांच्या कवितांची.

कविकवयित्रींचीं नांवें स्वरव्यंजनांच्या धुळाक्षरी क्रमानें दिलीं असून प्रत्येकाच्या नांवाखालीं त्याची एकूण कवितासंख्या दिली आहे आणि पुढें अनुक्रमें कवितेची क्रमिकसंख्या, नांव व पृष्ठसंख्या नमूद केली आहे.

**२१ श्री. पुरुषोत्तमपंत बुरकुले बी. ए., एल्एल्. बी.**

कविता दोन:—६४ अस्पृश्यांची जनता देवीला विनंति ९४, ८९ माझी ताई १३१.

**२२ श्री. "फकीर." लक्ष्मण प्रभाकर सोहोनी.**

कविता चार:—३८ प्रीतीचे बोल ४७, ८७ ओवाळणी १२९, ९० सासरीं जातांना १३४, ११५ लढाईवर जातांना १६५.

**२३ श्री. बाळ मंगेश कोलासकर ( सुकांत )**

कविता एक:—१०८ स्मृति १५८.

**२४ श्री. माधव बळवंत वैद्य ( मनोहर माधव )**

कविता तीन:—४४ प्रीतीची तळवार ५५, ४७ प्रेमप्रश्न-माला ५९, १११ ती तरवार १६२

**२५ श्री. माधव रंगनाथ काळे ( मञ्जुमाधव )**

कविता चार:—१७ कविताबालेस २२,३१ वंदन बलवंता ४१, १०० विधिघटना १४८, १३५ निराशेचा सूर १८४

**२६ कुमारी मालती कृष्ण पाध्ये.**

कविता एक:—८३ आमची बेबी १२४

**२७ श्री. मोरेश्वर रामचंद्र जोशी**

कविता चार:—५५ पुरे कर मुरली ७३, ७१ गुणाकर्षण १०९, १२८ कलिका १७८, १३० निद्रेप्रत गाणें १७९

**२८ श्री. रघुनाथ गणेश जोशी, ( पद्मविहारी )**

कविता अकरा:—२ शारदानंदन २, २१ माझी मायभूमि २६, ३० स्वातंत्र्य देवतेस ३९, ३५ मोहिनीस ४५, ४८ भावतरंग ६०, ५० निराशा ६५, ५४ प्रभु गोपाळा ७१ ७५ कोकिळेस ११३, ७७ संजीवनी ११६, ८२ हसऱ्या बालकास १२३,११८ काल आणि नदी १६९.

# गोदातटींचा गुंजारव

## शुद्धिपत्र

| पृष्ठ | कविता | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| ९ | ९ | १८ | चरणसवनीं | चरणसेवनीं |
| १३ | ११ | १७ | मा | मीं |
| १७ | १३ | १३ | हळंच | हळुंच |
| १९ | १४ | २२ | असे ता | असे ती |
| २५ | १९ | १० | भग्न | मग्न |
| ,, | ,, | १७ | जया | नया |
| २९ | २२ | १० | सुमता | सुमती |
| ,, | २३ | २० | पाहा | पाही |
| ४७ | ३७ | ६ | तणिस | तरुणिस |
| ,, | ३८ | १६ | मिळकत | मिळत |
| ५४ | ४३ | १५ | दगडी | दरडी |
| ७१ | ५४ | १४ | छडिती | छेडिती |
| ७६ | ५७ | २२ | ह पहा | हीं पहा |
| ९० | ६१ | ८ | य जो | ये जो |
| ९६ | ६५ | ५ | मूर्तप्रकाकराची | मूर्ति प्रभाकराची |
| ९७ | ,, | ७ | असच | असेंच |
| १०१ | ६६ | १६ | अर्व्याज | अव्याज |
| १०३ | ६८ | १८ | गानदवी | गानदेवी |
| १२२ | ८१ | १३ | शाभित | शोभित |
| १२४ | ८३ | १० | डालत | डोलत |
| १२७ | ८५ | ५ | बोले | बाले |
| १२८ | ८६ | १२ | तस | तसे |
| १२९ | ८७ | १४ | जगातला | जगताला |
| १३१ | ८९ | १८ | थट्रमाजिहि | थट्टेमाजिहि |
| १४२ | ९६ | ३ | मघोत्कर्ष | मेघोत्कर्ष |
| ,, | ,, | १७ | घारव्रता | घोरव्रता |
| १४६ | ९८ | १२ | स्ववर | स्वयंवर |
| १५३ | १०५ | २० | पाळ्या | पोळ्या |
| १६६ | ११६ | ५ | कतकमुखी | केतकमुखी |



डावीकडून उजवीकडेः—                    फोटोग्राफर—श्री. पु. वि. रहाळकर.

रा. नाथ निफाडकर; रा. पां. गं. लिमये B. A: रा. र. ग. जोशी ( पद्मविहारी ) रा. गं. के. सोनाळकर;
रा. ब. द्वा. ग. पाध्ये M. A: रा. वि. ना. वाड.

# गोदातटींचा

# गुंजारव

## भाग १ ला

## ईश्वरविषयक

### १ नमन

( कवि:—रा. ब. दा. ग. पाध्ये )

सीमा यदीय करणी रमणीयतेची, ।
लीला विमूढ करिते मति जाणत्यांची, ॥
विघ्नां हरी, वितरि सद्यश, त्या जगाच्या ।
केला प्रणाम चरणीं प्रथम प्रभूच्या ॥ १

विद्या, कला, कुशलता ललिता अनंत, ।
ज्यांहीं प्रभुत्व मिळतें मनुजां जगांत, ॥
पोषी तयां, सुखद रम्य हि संसृतीतें ।
देवी करी, तिजसि वंदुं सरस्वतीतें ॥ २

लोकीं अनेक दुसऱ्या विविधां गुणांच्या ।
भाषा असोत अति विस्तृत वाङ्मयाच्या, ॥

कीं साधुसंतकरिं केवल वाढलेली ।
ही एकलीसच सुकीर्ति जिला मिळाली ॥ ३

जी बाल्यि भक्तिरसपानपवित्र झाली, ।
तारुण्यि वीररसपुष्टि जिला मिळाली, ॥
पोषी प्रगल्भ अजि जे सकलां रसांला, ।
भाषा मराठि जननी, नमितों तियेला ॥ ४

भाषा अन्य जगीं, अनेक असती विद्वज्जनीं मानिता, ।
ज्यांचें वाङ्मय थोर, कर्णमधुरा वाणी, रसीं चारुता, ॥
माझ्या ओळखिच्या कितीक, मजला ठावीहि तन्माधुरी ।
पूजास्थानिं तरी मराठिच वसे माझे मनोमंदिरीं ॥ ५

---

## २ शारदावंदन

( कविः—पद्मविहारी )

( रागः- भूप. ताल- त्रिवट )

वाग्देवी ! तुज वंदन करितों ।
प्रमुदित सुमनें सुमें उधळितों ॥ ध्रु० ॥

श्वेत पद्म तव आसन साजे ।
करिं वीणा, वर दंड विराजे ।
मधुर निनादीं जीव डोलतो ! ॥

ललितकलादिक लीला अखिला।
देवि! दाविशी जगतीं सकलां ॥
बघुनि मानसीं विस्मय होतो! ॥

ज्ञान-कुंज नव फुलवीं आतां!।
मोह संहरीं अमले! पुरता; ।
तव पद-पद्मीं, भृंग रंगतो! ॥

---

## ३ धांव उमापति!

( कवीच्या 'संगीत शिवप्रसाद' नाटकांतून )

( कवि:—श्री. वि. ना. वाड )

( पद—चाल: नाचत ना गगनांत. )

धांव उमापति! धांव आतां! ॥
नाम सदोदित।
पुरवि मनोरथ।
उरत नसे संसार-चिंता ॥ धांव उमापति० ॥

मंगलकारक।
दुरित-निवारक।
दीनजनोद्धर तूंच त्राता ॥ धांव उमापति० ॥

---

## ४ नमन सुमंगलधाम

( कवि:—श्री. बाबूराव गाडगीळ )

नमन सुमंगल–धाम, गजानन !
शांत, सदय, शिवशंकर–तनया ॥ ध्रु० ॥

सकल संकटां हरी निशिदिनीं ।
सिद्धि सदोदित हात जोडुनी ॥ १

श्री–शुभदायक भवभयहारक ।
भो विघ्नांतक तूं गणनायक ॥ २

सुमनसुमाळा अर्पुनि तुजला ।
पूजन केलें, भो ! स्वीकारा ॥ ३

---

## ५ भक्ति

( कवि:—श्री. पां. गं. लिमये )

( भीमपलास )

निशिदिनिं घेई वदनीं प्रभुनाम ।
दिशिदिशि नेत्रीं पाही प्रभुमूर्ति ।
आयके श्रोत्रिं प्रभुकीर्ति ॥ ध्रु० ॥

देह हरीच्या पायीं वाही । चिंती स्वांतीं अन्य न कांहीं ।
मानि हरी सुखधाम ॥ १॥
सोडि न नीती प्राणांतींही । पीडि न अन्यां अपकृति साही ।
भूतिं धरी सम प्रेम ॥ २ ॥

---

## ६ चोवीस नांवें

( कविः—द्वारकारमण )

श्रीहरि—नामावांचुनि गेली व्यर्थ घडी जी, ती वंध्याः ।
यास्तव गाउनि चोविस नामें; करा सुजनहो ! ही संध्या ॥ध्रु०॥

सुरहरिविधि ज्या वश किंवा जो केशी दैत्या संहर्ता; ।
उत्तम ज्याचे केश म्हणुनि तो "केशव" नामातें धर्ता. ॥

मनुष्यजीवन यांचें अयनस्थान म्हणावा प्रेमानें; ।
आळविती ते, सज्जन त्यातें " नारायण " या नामानें. ॥

' मा ' म्हणजे श्री, लक्ष्मी किंवा भगवद्विद्या तिचा पतीः ।
यास्तव " माधव " या नामानें भाविक जन ज्यातें वदती. ॥

'गो' म्हणजे त्या गायी, भूमी, वाणी यांच्या प्रतिपाळा ।
करी म्हणुनि " गोविंद" असें तें नाम योग्य त्या गोपाळा. ॥

ज्याची कांती नभा पृथ्विला वेष्टुनि उरली अधिक पहा; ।
यास्तव त्यातें देती ज्ञाते "विष्णू" ऐसें नाम महा. ॥

मधु दैत्यातें चक्रें मारी अद्भुत विक्रम करूनियां; ।
"मधुसूदन" हें नाम धरियलें स्वतः आपणां म्हणूनियां. ॥

स्वर्ग मृत्यु पाताल तिन्ही हे लोक पाउलें व्यापियले, ।
तया " त्रिविक्रम " नाम म्हणुनियां साधुजनांनीं अर्पियलें. ॥

बटुरूपें बळिपाशीं गेला भूमि-याचना करावया ।
वंदनीय देवास योग्य ती " वामन " अभिधा धरावया. ॥

भूतमात्र जननी त्या श्रीतें धारण करि सप्रेम उरीं ।
यास्तव त्यातें नाम अर्पिलें " श्रीधर " ऐसें ऋषीश्वरीं. ॥

इंद्रियपति त्या क्षेत्रज्ञातें सर्व इंद्रियें वश म्हणुनी ।
" हृषीकेश " ही संज्ञा देती अद्भुत तेजातें गणुनी. ॥

तीन जगाचें कारण ऐसें पद्म जयाच्या नाभींत ।
" पद्मनाभ " ही यास्तव अभिधा दिली सज्जनीं सुशोभित. ॥

उदरीं बांधी माय यशोदा दाव्यानें व्रजवासि जया ।
" दामोदर " हें नाम शोभलें चतुर्मुखाच्या त्या पितया. ॥

करी प्रजेचें आकर्षण जो प्रळयीं मोठ्या नेमानें, ।
" संकर्षण " हें नांव तयासी देती सुजन प्रेमानें. ॥

वसुदेवात्मज किंवा झाला अष्टावसुपालक नामी ।
यास्तव कविजन विराम पावति "वासुदेव" या मधु नामीं.॥

द्युम्न द्रव्यें सम्यक् जो तो किंवा मूर्त स्वतां असे; ।
म्हणुनि तया " प्रद्युम्न " नाम हें मुनिवरवाचेमधीं वसे. ॥

विरोध ज्याचा कधीं न झाला शत्रूकरवीं आजवरी ।
यास्तव त्या " अनिरुद्ध " अर्पिलें गोड नांव हें सुरेश्वरीं. ॥

पुरुषांमध्यें उत्तम आहे शरीर जीवाहुनि भिन्न; ।
" पुरुषोत्तम " त्या नाम शोभतें घ्याया स्वमुखीं कां खिन्न ? ॥

शक्त न इंद्रियजन्यज्ञाना; लीनपणें पण शक्त असे; ।
म्हणूनि त्यातें वदति " अधोक्षज " दिसे न जो, देहांत वसे. ॥

भक्तासाठीं देह नराचा, मुख परि सिंहाचें धरिलें, ।
" नारसिंह " हें रूप तयाचें आर्यांसाठीं अवतरलें. ॥

अविकारी ज्या रूपा नाहीं गळण्या पडण्याची भीति; ।
" अच्युत " ऐसें नाम विसावें कविजन त्यातें समर्पिती. ॥

ज्यापाशीं कल्याण इच्छि जन; दुष्टां दंडन तो करितो; ।
यासाठीं त्या वदति " जनार्दन" भक्तवृंद ज्या मनिं धरितो. ॥

जो इंद्राचा अनुज जहाला किंवा इंद्रादिक गमला; ।
यास्तव वदती "उपेंद्र" त्याला ध्याउनि मुनिगण मनिं धाला. ॥

पापांतें जो हरितो तैसा संसृतिहेतू पुरा करी; ।
पूर्ण दयालुत्वानें " श्रीहरि " किंवा " हरि " हें नाम धरी. ॥

वर्णानें जो कृष्ण त्यापरी नरनारायण व्यास मुनी ।
रूपत्रयिं हो नटला तेणें " कृष्ण " असें त्या वदति जनीं. ॥

अथवा लोकत्रय हें सगळें स्वगुणांनीं जो आकर्षी ।
यास्तव त्याला " कृष्ण " नाम हें ठेविति मुनिवर, राजर्षि. ॥

अशा प्रकारें भगवन्नामें भगवंतस्तुति ही झाली, ।
श्रीधर–सुत गोपाळनामधर जोशी याची मति धाली. ॥

---

## ७ अलिप्त

( कविः—श्री. पां. गं. लिमये )

( भूप )

प्रणति सुरवर हरा ! । वरित दुर्गा । धरि गंगा; ।
सविष-फणि-सुधाकरां कंठगतकपालहारा ॥ धृ० ॥

दूषित करित न कपाल । गंगा नच शुचितर ।
विषें न भीयुत । सुधा न वांछित । जरी उमारत ॥ १

अंतरिं अविचल नितांत । साक्षी आत्मनिरत ।
त्यजी न संसृति । धरी न अति रति । तयाप्रति प्रणति ॥ २

---

## ८ हें कोण येथें वसे ?

( कविः—श्री. पुरुषोत्तम विश्वनाथ रहाळकर )

आहे विश्व अफाट हें पसरलें, शोधूं तुला मी कसें ? ।
मातें हें नुमजे मुळींच म्हणुनी; लागे जिवाला पिसें ! ॥

नाहीं नांव तुला, न रूप गुण वा कांहीं न लागे तुला ।
सर्वांच्याहि पलीकडे असासि तूं, सर्वांहुनी वेगळा ॥ १

ध्याती सर्व तुला परंतु दिससी कोणास ना तत्त्वतां ।
शास्त्रें सर्वच वर्णिती तुज परी, आहेस दूरी स्वतां ॥

बोले केवळ ' नेति नेति ' म्हणुनी छंदोमया वाणि ती ।
कैसा मी दुबळा स्तवूं तरि तुला, हें गूढ वाटे अती ॥ २

सृष्टीच्या नियमेंच संतत अशी, ही सृष्टि चाले जर ।
नाहीं पाप नि पुण्य, फोल सगळें, तूं कोठला ईश्वर ! ॥
वेडथांच्या मनिचेंच वेड नुसतें, निस्सार, निस्सार तें; ।
छे ! छे ! 'ईश्वर' कल्पनाच अगदीं खोटी, असें वाटतें ॥ ३

× × ×

तों आंतुनि हळूंच कोणि वदलें "हां थांब ! थोडें कसें !" ।
आंतूनी वदलें कुणी तरि हळूं " हें कोण येथें वसे ? " ॥

---

## ९ नवविधाभक्तीचे नऊ साक्षीदार

( कविः—द्वारकारमण )

श्रीविष्णूची भक्ति नवविधा सुधा जशी अभिनव ।
भक्तिवश साक्षी संख्या नव ॥ ध्रु० ॥

परिक्षिती तो साक्षी पहिला " श्रवण " भक्तिसी करी; ।
निवटि हरिकृपें मत्त भव-करी. ॥

श्रीशुकमुनिवर " कीर्तन " भक्तिप्रेम अखंडित वरी; ।
शमदमें षड्रिपुंतें आवरी. ॥

प्रल्हादानें " स्मरण " भक्तिनें वश केला नरहरी; ।
संकटें भक्ताचीं जो हरी. ॥

श्रीलक्ष्मीनें " चरणसेवनीं " भक्ति साधिली पुरी; ।
मिळाली ज्योति जशी कापुरीं. ॥

पृथुराजानें "विष्णुपूजनें" गुढी सौख्य सागरीं; ।
उभविली भक्तीच्या आगरीं. ॥

अक्रूरानें " वंदन " करुनी नंदनंदनावरीं; ।
ठेविली भक्ति सदा अंतरीं. ॥

मारुतिराया " दास्य " भक्तिची हृदयीं आवड धरी; ।
बसवुनी दाशरथां कंधरीं. ॥

अर्जुन करि त्या " सख्य " भक्तिनें विवश सखा श्रीहरी; ।
समरिं जो श्वेत अश्व आवरी. ॥

बळिनें भरल्या " आत्मनिवेदन " भक्तिजलें घागरी; ।
तिष्ठवी देव आपुल्या घरीं. ॥

(चाल)—या भक्तिरसाच्या नव मूर्ती वाहतां ।
होतसे सौख्य अति त्यांस मुखें बाहतां. ॥
या नव धेनूंच्या नव दुग्धा दोहतां ।
प्राशितां दुग्धसुख नरदेहीं राहतां: ॥

गोपाळाची कविता सुज्ञा दिसेल ही जरि नव ।
तरि घ्या नवीन कृतिची चव ॥



# भाग २

# कवि काव्य इत्यादि

## १० कवि आणि कविता

( कवि:—रा. ब. दा. ग. पाध्ये )

देवी कविता:—

“ नित्याचें मम राहणें, विहरणें, आनंदणें, क्रीडणें, ।
कर्तव्या करणें, श्रमासि हरणें, विश्रब्ध संभाषणें, ॥
—तें सारें कविच्या गृहीं; मम असे माहेर तें सासर; ।
तेथें सत्य, सुरम्य एकवटतें: तें प्रीतिचें आगर. ॥ १

ब्रह्मानंदसुखांत तेथ रमतें मी सर्वदा सादर; ।
शृंगारादि तिथें मला रस नऊ सेवावया तत्पर; ॥
शब्दार्थीमधल्या अलंकृति, तिथें, भाषेंतल्या संस्कृती; ।
लक्ष्यव्यंग्यसुवाच्य अर्थ सगळे तेथें सुखें नांदती ॥ २

भाग्याचा पुतळा, कवी, मम सखा जीवश्च कंठश्च तो, ।
माझा ताइत तो, गळ्यांत मणि तो, माथां हिरा शोभतो; ॥
त्याचेंवीण मला मुळीं न करमे; त्यातें न माझेंविणें; ।
प्रेमैक्यें रचिलीं अम्हांत, न तशीं लोकीं दुजीं बंधनें. ॥ ३

पाठीसी असणें सदा, शुभशुचि स्फूर्ती तया अर्पिणें, ।
त्याच्या मानसकल्पनौघि रसना—नौकेंत आंदोलणें ॥

—माझें जीवितकार्य हेंच–कविच्या कीं अंतरंगांतुनी।
ठेवावे सुविचार वेंचुनि, मनोहारी पदीं रेखुनी. ॥ ४

ईशप्रेरित ते विचार !!! उपमा नाहीं तयां मोलही; ।
त्यांचेवीण मुकेल सर्व मृदुता, सौंदर्य सारें मही; ॥
निर्बंधा नयनीतिच्याहि कठिना देतो कवी चारुता; ।
प्रेमानंदभरें करी हृदयिंच्या वृत्ति प्रसन्नोन्नता. ॥ ५

मोही तो मतितें, बळें, हृदय तो संपूर्ण आकर्षितो; ।
तो तत्त्वज्ञ, नयज्ञ तो, विबुध तो, विश्वा गुरू साजतो; ॥
लोकीं यापरिचा प्रभाव वरितो, लोकीं परी तो नसे; ।
त्याची भिन्नच सृष्टि, जीवन दुजें, वृत्ती निराळीच से.॥ ६

वाखाणी जन, दूषणास अथवा देतो, न तें पाहतो; ।
संसारांतिल नश्वरीं न विषयीं चित्ता कधीं गोवितो; ॥
स्वीयानंदविचारसागरिं, तपश्चारी, निमग्नें मनें, ।
सत्यां आकळतो, त्रिकाल भुवना जीं भूतिचीं साधनें.॥ ७

सूर्यास्तोदयिं, चंद्रमा वितरतां शीतप्रभा भूवरी, ।
तेजें दिव्य हिरे नभीं चमकतां, नेतां तमा वा दुरी, ॥
रानीं पल्लवपुष्पगुच्छ फुलतां, मोहे कवीचें मन।
कैसें अन्यविचार–शून्यः–न कुणी जाणे कवीवांचुन. ॥ ८

केव्हां मेघनभाब्धिच्या सम रमे विस्तीर्ण वस्तूंत धी; ।
पुष्पीं, षट्पदिं, वा पतंगिंच मती गुंगोनि जाई कधीं; ॥
भावांतें मनुजांचिया हृदयिंच्या गूढां कधीं शोधतो; ।
जे लोकीं सदसत्ः-प्रवाह सगळे त्यांचे कवी जाणतो.॥ ९

हेमंतीं न, वसंतिही न, न मिळे मेघांचिया सिंचनीं, ।
ऐसें दिव्यफलप्रदत्व कविच्या राहे सदा चिंतनीं, ॥
निर्मी सृष्टि कवी म्हणूनि रुचिरा निर्व्यंग अन्यूनशी, ।
नाहीं साध्य जशी विधीस,तुलना नाहीं कुठेंही जिसी.॥१०॥

निर्जीवा कविसृष्टि नाहीं कविला लोकांत कर्तव्यता, ।
निःसत्त्वाच समग्र तत्कृति जगीं दावी मतिभ्रांतता, ॥
-धिक्कारो व्यवहार"सुज्ञ" कितिही दर्पांध एणेंपरी, ।
विश्वाचा अमरत्वहेतु परि ती; सत्सत्य मूर्ती खरी. ॥११॥

सुभग रुचिर ऐशा सत्कृतीतें कवीच्या ।
जतन करितसें मी देशकालांतरींच्या ॥
म्हणुनिच कविता मी देवता वंदनीया ।
मजसम जगिं धन्या नाहिं कोणीहि मान्या. ॥ १२ ॥

---

## ११ कवितेस !

( कविः—श्री. वि. ना. वाड )

( चाल: श्रीमंत पतीची राणी )

मी किती कष्ट हे केले । तुजसाठीं मोहक बाले ॥
रात्रंदिन ध्यास मनीं तो । आप्तांसहि झिडकारीलें ॥

वेडा मज वदती कोणी ।
कटु वचनांनीं अवगणुनी ।
मी सोडिं धनावरि पाणी ॥
लौकिका मनिं न आणीलें । तुज० ॥ १

बहु दिवसांची ही आस । सेवीन मायभाषेस ॥
'प्रासादियमक' येईना । गति 'अलंकारिं' चालेना ॥
'व्याकरण'-नियम ना शिकलों ।
स्फूर्तीस पारखा झालों ।
घे पदरिं; शरण तुज आलों ।
मन माझें भ्रांत जहालें । तुज० ॥ २

तव कृपाकटाक्षें जाण । उल्हसित वृत्ति होईल ॥
नादी मी जगिं ठरलों त्या । उत्साह मला लाभेल, ॥
हो प्रसन्न मजवरि रमणी ।
मज सोडुं नको विस्मरणीं ।
लागलों पिशापरि चरणीं ।
ध्येय हें एक उरलेलें ॥ तुज० ॥ ३

---

# १२ स्फूर्तीस

( कविः—श्री. स. वा. निफाडकर )

परतून जा आली तशी, थारा न ह्या हृदयीं तुला ।
थांबूं नको क्षण एकही, संबंध मीं तव तोडला ॥

प्रिय वाटलिस मज एकदां विटलों परी गे आजला।
देऊं नको निजदर्शना, भुलणार मी नाहीं पुन्हा ॥

भुललों कसा अन् लागलों नादीं तुझ्या मज ना कळे ।
का पाजुनी मदिरा मला हा डाव गे तूं साधला ! ॥

तूं भेटतां वरच्यावरी अन् बोलतां लाडें मशीं ।
मज वाटली प्रीती खरी, भोळ्या मना नच्च कलपना ॥

मच्चित्त मीं नेऊं दिलें; स्थलही तसें हृदयीं दिलें ।
अन् जाहलों तव दासही, परि हा ! गळा तूं कापला ! ॥

चटका जिवा मम लावुनी, कां मारिसी आतां दडी ?।
विरहें असा मी पोळतां, आनंद कां होतो तुला ! ॥

तूं दाविलीं ना त्या क्षणीं चित्रें सुखाचीं मन्मना ! ।
स्मृति देउनी मग होम कां आतां जिवाचा मांडला ? ॥

मीं सोडिला संसारही सारा तुझ्या आशेवरी, ।
बनलों फकीरहि; तूं परी हा जीव माझा टांगला. ॥

जन बोलती " वेडा, खुळा, उठला जगांतुनि, मूर्ख हा " ।
किति साहिले कटु शब्द मीं; येती न कां तुझिया मना ॥ ।

मज मारणें वा तारणें हातीं तुझ्या हें, लाडके!
मरणांतची सुख वाटतें; सहवास हा नलगे मला.

परि मान्य तूं करिसी जरी "नित सारखी राहून मी
गाईन गाणीं यापुढें" रुसवा कुठें मग राहिला!

---

## १३ "कोण ही बाला"..........( प्रतिभा )

( कवि:—श्री. रामचंद्र वासुदेव कुळकर्णी )

( चाल:—एडका मदन )

कोण ही बाला—रसिकांनो, बोला बोला ॥
आनंदाची उकळी फुटतां ।
नाचत गुंगत गाणीं गातां ।
मोदवितें जी द्विगुणित चित्ता ॥
खेळ करि सारा—रसिकांनो बोला बोला ॥ १ ॥

नैराश्याचें भरतां वारें ।
फोल वाटतें जग हें सारें ॥

मनांत सारी हुरहुर पसरे ।
घालवी तिजला । रसिकांनो, बोला बोला ॥ २ ॥

उदासतेच्या विषण्ण चित्तें ।
जातां उद्यानींही दिसते ॥

स्मशानांतही कधीं भटकते ।
सदा हा चाळा—रसिकांनो, बोला बोला ॥ ३

सौंदर्यें जयिं सृष्टी नटते ।
फुलांफुलांशीं हितगुज करते ।
झ़ळझ़ळ वाऱ्यावरती तरते ।
हांसरी बाला—रसिकांनो, बोला बोला ॥ ४

हृदयामध्यें जी लखलखते, ।
क्षणांत दिसते, क्षणांत लपते,—।
कवीस त्याची जाणिव होते; ।
चपला बाला—रसिकांनो, बोला बोला ॥ ५

पायिं पैंजणें गळ्यांत गाणें ।
लाल कपोलीं हळंच हांसणें ।
रसिक रंगती ह्या जादूनें ।
लाजरी बाला—रसिकांनो, बोला बोला ॥ ६

सुंदरतेहुनि दिसते सुंदर ।
कोमल पुष्पाहुनि सुकुमार ।
चंचल चपलेहुनिहीं चपल ।
कोण ती बाला—रसिकांनो, बोला बोला ॥ ७

अणुरेणूशीं दृष्टि भिडवितां ।
ब्रह्मांडाची देइ योग्यता ।
ब्रह्मांडाही कोपे बघतां ।
करी निःसारा—रसिकांनो, बोला बोला ॥ ८

मर्यादेचें बंधन तोडुनि ।
स्वर्ग धरा ही एकच करुनी ।
आकांशातिल पुष्पें खुडुनी ।
गुंफिते माला—रसिकांनो, बोला बोला ॥ ९

चहुं बाजूंनीं गंध दरवळे ।
जनही त्याच्यामधें गुंगले ।
त्या गुंगींतच गाणें स्फुरलें ।
कोण ही बाला?—रसिकांनो, बोला बोला ॥ १०

---

## १४ संगीत आणि चित्रकला

( कविः — श्री. सोपानदेव चौधरी )

( चालः—वीरा अमरा )

प्रातःकाळीं कुणी बालिका शिपित होती सडा ।
श्रवणिं ये शिपक्यांचा सडसडा ॥
त्यास द्यावया साथ सुराची ताल धरुनि केरवा ।
करितसे सूं सूं सूं या रवा ॥
यांत भरीं घातला करींचा मंजुल कंकण रव ।
करी या गाण्याचा गौरव ॥

(चाल) पायांत तोरड्या छुम्‌छुम् करिती पहा ।
मधु मेळ मिळाला त्या ललकारींत ह्या ।
कीं स्वर्गि चालला नाच देविचा अहा ! ॥
नयनमनोहर नाच दाखवी नाचुनि बाला स्वतः ।
नाचवित रसिकांची रसिकता ॥ १

नाच पाहुनी वेड साच हें नच संपे जीविचें; ।
नाचणें नच कीं संपायचें ! ॥
नाच संपला, त्यांतच तें संपलें सडासिंचन; ।
भरुनियां गेलें सर्वांगण ॥
करितां दृष्टिक्षेप त्यावरी आनंद मनीं भरे ।
श्रमाचें सार्थक झालें खरें, ॥
(चाल) " मज गमते बाई ! जणूं अंगणावरी ।
पसरिलें खरोखर वस्त्रच हें तपकिरी । "
बोलली बालिका आनंदाच्या भरीं ॥
हौसेनें मग काढुं लागली रांगोळी त्यावरी; ।
सजविते निजकृति अपुल्यापरी ॥ २

प्रथम काढिली कसलीशी ती कमलाची स्वस्तिका ।
राहिली स्तब्ध जरा बालिका ॥
ओंठ खालचा दांताखालीं; नजरहि खालिच करा; ।
चालला विचार कसला तरी ॥
नजर असे ता निरीक्षणाची; निरखुनि घरचेवरा, ।
परीक्षण रांगोळीचें करी ॥

(चाल) मग नकारतेची मान तिनें हलविली ।
चट्दिशीं करें रांगोळि पुसुनि टाकली ।
त्यायोगें मनिंची उत्सुकता वाढली ॥
मम उत्सुकते ! नको उताविळ होऊं इतुकी गडे: ।
पाहि होणारें जें जें घडे ॥ ३

दुसरें कांहीं तरी काढुं या, नको अतां स्वस्तिका ।
पुटपुटे स्वतांशींच बालिका ॥
चतुष्कोण पुष्करिणि फुलांची कां साधी कोयरी ? ।
कोयरी कमळाची गोजिरी ? ॥
वेलीची कोयरी काढुं का; तुळशी—वृन्दावन ? ।
अथवा सांखळिचें आसन ? ॥
(चाल) परवां, काय बरें, शेवंतीचें फुल ।
कालशीं काढिली, ती तेलंगी-भुल ।
मग नाभिकमल हें आज काढुं या तर, ॥
मजला रंगित नाभिकमल हें छान, फार आवडे: ।
नाभिच्या देठापासुन गडे ॥ ४

रांगोळ्यांचे केव्हांपासुनि विचार केले तरी ।
कितिक ते गेले वाऱ्यावरी ॥
काढुं लागली तयीं भराभर रांगोळ्या अंगणीं: ।
नव्या वरचढी रोजच्याहुनी ॥
गांठोडें काढिलें; गांठिलें ज्यांत माझें मन; ।
ठेविलें प्रेमभरें बांधुन ॥

(चाल) तो चक्रव्यूह जणुं हृदयांगणिं रचियला ।
मन्मनोऽभिमन्यू त्यांत पुरा अडकला ।
बाहेर निघाया युक्ति नाहिं त्याजला ॥
धन्य बालिके! धन्य चतुरिके; शिकलिस गे कोठुन ।
द्रोणाचार्यांची शिकवण ? ॥ ५

---

## १५ दोन ओळी

( कविः—विर्नात )

काव्याचीं चरणें तुला जिवलगे, देतों गडे, धाडुन; ।
सृष्टी रंजविण्या दिवाकर जसा, धाडी उषेलागुन. ॥
सोडी तानहि कोकिला अति मुदें, आम्रीं वसंतांगना. ।
यावी वीज नभीं म्हणूनि करिती ते मेघही गर्जना; ॥
विश्वाची वहिवाट ही दिसतसे-बाले, तुझा संगम ।
जीवाला अधिच्या सुखें भरवुनी देईल हर्षोद्गम. ॥

---

## १६ एकच इच्छा.

( कविः— श्री. केशव श्रीपाद कानेटकर )

गेलीं वीस, तशींच पांच पुढचीं वर्षे वयाचीं वृथा, ।
भाग्याचा नर तोच, चिद्विकसना बाल्यांत जो लाधला, ॥
कालौघासह जात नित्य असतां ना भान माझें मला, ।
आई काय असेंच आयु अवघें लागे मनाला व्यथा. ॥

पुष्पांनीं भरलें समग्र वन हें, झाडें फळांनीं तथा; ।
हर्षाची उकळी उठून जगतीं आनंद कोंदाटला; ॥
अन्तर्बाह्य विकास दृष्टि पडतो प्रत्येक वस्तूंतला, ।
आकारा मम येत कां न मन तें मद्देह देवा! तथा? ॥
माझें मानस तें कधींहि विकसो, माझी मती वाहते—।
तूझे पुण्यपदांस, गाढ, शुभगे! श्रीशारदे देवते !॥
सान्निध्यांत तुझ्या पवित्र असतां, अन्या नसे कामना; ।
सन्माला सुविचारसृष्ट मजला दे अर्पण्या सज्जनां! ॥

---

## १७ कविताबालेस—

( कविः—मञ्जुमाधव )

( चाल—सबसे रामभजन कर )

अखेरचा हा बोलचि । कविते । धांव सखे, आतां ॥ ध्रु० ॥
निराश मनिंच्या भकास गगनीं तारा लकलकतां ।
राजस बाले तूंच एक गे, कोण दुजा त्राता? ॥ १
सुखदुःखाच्या सागरिं लढतो दमल्या दों हातीं ।
कारण त्याच्या तळीं चमकती तव हसरीं मोतीं ॥ २
त्वद्विरहाची ज्वाला भडके हृदयीं मम थोर ।
अखंड वाहो त्वत्प्रेमाच्या अश्रूंचा पूर ॥ ३
अश्रू ना ते गमती तारा स्फुरतां मनिं गाणीं ।
खळी हांसरी तुझ्या गालिंची चंद्रकोर मानीं ॥ ४

जगताच्या ह्या निष्ठुरतेची जाणिव मज झाली ।
निष्प्रेमाची स्वार्थाची ती सुरी उरीं घुसली ॥ ५

परि तूं करिशिल ह्या दासावरि जरी अमृतवृष्टी ।
निज रक्तानें रंगवीन मग अफाट ही सृष्टी ॥ ६

व्याकुल कोकिल मम जीवाचा गान तुला गाई ।
वसंत फुलुं दे तुझ्या स्फूर्तिचा ये ये लवलाई ॥ ७

सरली आशा विरलि मनीषा तूं दर्शन देतां ।
द्वैताची ती कुठली भाषा ? एकचित्त होतां ॥ ८

कपोल गाला हस्त कराला ओष्ठहि अधराला ।
कथील बाले ज्या गुजगोष्टी-काव्यें जगताला ॥ ९

मम जीवाची आशा ईशा ही करुणा भाकी ।
अखेरच्या श्वासाचें संगित विरो तुझ्या अंकीं ॥ १०

---

## १८ देवा, एवढें तरी दे !

( कविः—नाथ निफाडकर )

मोक्ष बीक्ष नलगे कांहीं; वल्गना नको त्या ! ।
मोक्ष दूर कुठला कोठें ! माझि ना तपस्या ! ! ॥ ध्रु० ॥

अजुन तृप्त झाला नाहीं नाथ भावनांनीं; ।
स्वप्न अजुन आलें नाहीं एकही जमूनी; ॥
स्वप्न गोड, अनुभव पर ते माखले विखांनीं; ।
वीख गोड करितों तरिही दाह अंतरात्म्या ! ॥ १

आज देव ! नलगे वृत्ती विश्वधारणेची; ।
आज ईश ! चिमणीचीही[1] आस ना मनींची; ॥
या मनांत आवड नव्हती हिऱ्यामाणकांची; ।
थोर भावनांच्याही या जाहल्या चिटोऱ्या ! ॥ २

देवदेव ! इवलेसें हें मागणें तरी दे; ।
बेट एक सुंदर निर्जन, ( स्त्री नको ! ) मला दे; ॥
तिथें काव्यशास्त्रांमाजीं चित्त मम रमों दे; ।
सृष्टि तूं नि चिंतन माझें, वृत्ति दे सुखाच्या ! ॥ ३



---

१ मृत पत्नी.

# भाग ३ रा.

## भक्ति आणि आदर

---

### १० धांवा.

( कवयित्रीः—सौ. प्रभावतीबाई गाडगीळ )

(चालः—" उठि गोपालजी "—ताल-झपताल)

धाव तूं श्रीहरी पाव वेगें
दुरित-रिपुसंगरीं राहि संगें ॥ धृ० ॥

हृदयगत कामना पुरविशी भावना
कां तुला येइना आजि करुणा ? ॥ १

दुःखडोहीं महा भग्न झाला पहा
आर्यजन-देश हा सोडवी त्या ॥ २

हिमगिरी तो शिरीं सिंधु, गंगा उरीं
कटिसि गोदावरी पुण्य भूमि ॥ ३

सेतु रामेश्वरीं विश्व वंदन करी
खड्ग मारी वरी दुष्ट दैव ॥ ४

धर्म गेला लया दैन्य देवालयां
ठाव नाहीं जया पारतंत्र्यीं ॥ ५

धाव झणिं राजया वाट पाहे जया
भरतभूमाजिं या आर्यतनया ॥ ६

---

## २० मातृभूमि

( कविः—श्री. पां. गं. लिमये )

( पूर्वी )

सकृप हरी मम मातृभूमिवरि ।
अवलोकीं, तुज याचि अन्तरीं ।
उद्धरि दीना धरुनि निज करीं ॥ ध्रु० ॥

निजहित-जागृति होउ झडकरी ।
ज्ञानपवन करु भ्रमपटल दुरी ।
सकळ अघ दुरित त्वरित संहरी ॥ १

धी-धृति-बलयुत बहु नरनारी ।
निज देशास्तव शिणुत शरीरीं ।
विलसु सदा ही वैभव-शिखरीं ॥ २

---

## २१ माझी मायभूमि

( कविः—पद्मविहारी )

मायभूमि ! तूं आनंदाचें सौख्याचें उपवन ! ।
स्वीकरीं शाहीरी वंदन ॥ धृ० ॥
आस मोठि मनिं ही तनु लागो तव सेवेकारणीं ।
शुचितम कर्तव्याच्या रणीं. ॥

विमल उदरि तव जन्मुनि रमलों, बसलों अंकीं, कडे।
माझें भाग्य अहा ! केवढें ! ॥
नूतन जगतीं जन्मल्याक्षणीं येई मजला रडें ।
कार्णि तों वाणी कुठली पडे ॥
" तूं असाच रडशिल काय सदा सर्वदा ?।
ही ध्वजा रडण्याची हरील कां आपदा ! ।
चल ऊठ ! मायभू हंबरते कितिकदां ! " ॥
रडें थांबलें, हास्य विकसलें माझ्या गालीं नवें ।
आलीं हर्षाचीं आसवें ! ॥ १

उत्कंठनें मागें बघतां स्मृति-जागृति होउनी ।
स्मरती विभवाच्या अठवणी ! ॥
प्रेमाश्रूंनीं इतिहासाचीं पानें भिजतीं सदा ।
नुरतें देहभान तें तदा ॥
रोमांचित तनु होइ, विसरतों बाह्य जगा सर्वथा ।
हृदयीं स्फुरते गत वीरता ! ॥
किति रम्य चित्रपट दिसती नयनीं: क्षणीं ।
परि सकलहि जाती वाऱ्यावरि वाहुनी ! ।
त्या कुतूहलाची तृप्ति न झाली मनीं. ॥
भासो स्वप्नाभास कुणाला, सत्य गमे अंतरीं ।
याहुनी सत्य न विश्वांतरीं ! ॥ २

तपोभूमि तशि पुण्य-कर्म-भू नांव तुझें गाजलें ।
सारें विश्व तुला लोभलें ! ॥

क्षीराब्धीची शय्या त्यागुनि तव अंकीं धांवुन ।
किति कदां रमले नारायण ! ॥
त्रिभुवनासहीं अगम्य ऐसा कर्ममार्ग जो भला ।
प्रभुनें स्वयेंच कथिला तुला ! ॥
किति साधुसंत-सद्भक्त इथें जाहले ! ।
किति तत्त्वज्ञानी थोर थोर जन्मले ! ।
किति पराक्रमी नृप, सत्कविही गाजले ! ॥
स्वर्णभूमि तूं ! तुजसम कोठें भूमि नसे भूवरी; ।
दिसली स्वप्निं कुणाला तरी ? ॥ ३

चपल-चंचला स्वातंत्र्य-श्री स्वैरपणें विचरली ।
त्रिभुवनीं वीरसूच शोभली ! ॥
धी लक्ष्मी तशि तेज-ओज हीं स्वच्छंदें नांदलीं ।
तवपदीं ऐश्वर्यें लोळलीं ! ॥
हाय ! हाय ! परि आज शृंखला परवशतेची पदीं ।
निर्जल स्वातंत्र्याची नदी ! ॥
तूं नको नको गे, खेद करूं स्फुंदुन ।
नव भविष्यतेचा वसंत मी फुलविन ! ।
गत स्वातंत्र्य-श्री खेंचुनिया आणिन ! ॥
जोंवरि हा विश्वास तोंवरी तव उदरीं जन्मुन ।
तुजला करीन सर्वार्पण ! ॥ ४

---

## २२ आर्यमाता

( कविः—रा. ब. दा. ग. पाध्ये )

सुरनरमुनी यशोगीत गाती ।
भारत-भू प्रिय आर्या ती ॥ धृ० ॥
ही सात्विकतेची गुरु गणिती ।
नरजाति-मातृपद शाभवि ती ॥
ही सदय संस्कृती मूर्तिमती ॥ सुरनरमुनी० ॥
धनमदानें धुंद होती । बळी राष्ट्रें जगीं किती ! ।
विपदिं धीरा, सुखीं सुमताः— आर्यमाता एक तीः— ।
अशी अग्रणी । जननी, धनिनीं । हिंदभूमि गुणी ।
हृदयाकर्षिणी । भावीं रत । तुज अर्पित ।
धन, तनु, जीवित । आर्यसुतासुत । सुमती ॥
सुरनरमुनी० ॥

---

## २३ सत्पुरुष

( कविः—श्री. पां. गं. लिमये )

( तिलककामोद )

करि हरिच्या ध्याना । शिवे न कांचना ॥ धृ० ॥
दृष्टि दयार्द्रा जीवितमात्रा वृत्ती शांता लीना ॥ १
भूजलव्योमीं पाहा देवा । ललना मातृसमाना ॥ २

---

## २४ सरिता सरस्वतीचें आवाहन

( कवि:—नाथ निफाडकर )

( कवीच्या "इंद्रसूक्त" काव्यांतून )

येई तूं जननी अनंतगुणिनी ! उत्फुल्ल या गायनीं !
आशीर्भाषिणि तूं सरस्वति, सुरां स्फूर्तिप्रदा मंगला ! ॥
तारांचे तट ते तुझे चमकतो आकाशकोशामधीं; ।
माझा मानस-कोशही चमकवीं इंद्रस्तवाकारणीं ! ॥
माते ! शांत सुनीलशा तव जलें वात्सल्य वाहातसे; ।
पापक्षालिनि तूं तशी शुभकरा, दुग्धामृता दे मला ! ॥
विद्वेषें नच नाथ-मानस जळो ऐसी कृपा राहुं दे; ।
प्रेमें मानव-जाति-गीत करुं दे इंद्रस्तवाकारणीं ! ॥
आकाशांतुनि पर्वतीं उतरसी तैशीच ये मानसीं; ।
नाना देशिं जशी विहार करिसी तैसेंच काव्यीं करीं ! ॥
पर्जन्यें फुलसी तशींच भरुं दे सूक्तेंहि मद्गायनें; ।
लाटांच्यासम थाट गायनिं उडो इंद्रस्तवाकारणीं ! ॥
देवांची दुहिता; सदा तरुण तूं; स्फूर्ती तुझीही नवी ! ।
देवांचें तव हें दिनींदिनिं नवें संगीत सौभाग्यवान् ! ॥
नाना रंगिं सुमंगल स्तविं जगा आल्हाद तूं अर्पिसी; ।
नाथा गौतमगोत्रजा स्फुरवि तूं इंद्रस्तवाकारणीं; ॥

———

## २५ बाल–गुरु

( कवयित्रीः—सौ. प्रभावतीबाई गाडगीळ )

ब्रह्मचारि शुचि गोकुळिं कीं हरी ।
सरुं नको गुरुराय ! दुरी दुरी ॥
मम मनीं भरलासि मनोहरा ।
स्थिर वसो हृदिं मूर्ति कृपाकरा ॥ १

कुरळ कुंतल भूषवि आनना ।
विमळ भाळ करी मतिबंधना ॥
अगइ ! भस्म विभूषण होतसे ।
जणुं शशांक नभोऽगणिं येतसे ॥ २

सजल नेत्रिं विजेपरि दिव्यता ।
प्रकट होइ कुणी जणुं देवता ॥
अभयतेसह वत्सलता पुरी ।
मिळुनि मूर्तिच ही बनली खरी ॥ ३

भ्रुकुटिमध्य मनोरम गोंदिला
करि जणूं भवसंसृति शीतला ॥
उभयकर्णि विराजति कुंडलें ।
जणुं नभोऽमणि तैजस मंडलें ॥ ४

सरळ नासिक रेखिव शोभतें ।
स्तिमित हास्य मुखावरि राजतें ॥
रुचिर सुंदर रक्तिम ओष्ठ ते ।
अरुणकांति नभीं जशि फाकते ॥ ५

विमल भस्म तनूवरि चर्चिलें ।
वरति गोड त्रिपुंड्रहि लाविले ॥
कटितटीं अति कोमल मेखला ।
वसनिं अल्पहि फारच शोभला ॥

करिं कमंडलु छाटि भुजेवरी ।
मुगुटसा कचगुच्छ शिरावरी ॥
चरणिं सुंदर चंदन-पादुका ।
क्रमुनि दावि पथास भवांतका ! ॥

स्थिरमनें स्मरतां गुरुरूप ।
प्रगटतें हृदयीं प्रभुरूप ॥
सुमनिं पूजिति जे गुरु पावन ।
त्वरित लाभति पाप-विमोचन ॥

---

## २६ शिव-गीत

( कवि:—श्री. रामचंद्र वासुदेव कुळकर्णी )

( चाल:— निज बाळारे )

शिवराया ! ये जनन पुन्हा घेवोनी ।
मागणी हीच तव चरणीं ॥
दिल दोस्त तुझी सारी मावळ जात ।
भारीच काढिते खंत ॥
जिवप्यार तुझी माता तुजवांचोनी ।
बघ दिसते केंविलवाणी ॥

(चाल) आधींच तनू कृश झाली ।
भर तशांत बंधनिं पडली ।
मग कोण तियेतें वाली ? ॥
चल धांव झणीं ऐश्वर्य तिला देई ।
डोळ्यांत प्राण कीं येई ॥ १

बघ रायगडीं भगवा झेंडा झुरतो ।
दुःखाचीं गाणीं गातो ॥
त्या सिंहगडीं कडकपारींमधुनी ।
उठतसे गर्जना अजुनी ॥
(चाल) ती अजब वारुची फेंक ।
शत्रूस पाडि जी धाक ॥
मर्दानि वेश तो झोंक, ।
ही बघण्याला उत्सुक झाली भारी ॥
दुरखवनची दुनिया सारी ॥ २

आनंद जिथें मूर्तिमंत कीं हसला ।
आम्हांस पारखा झाला ॥
स्मृति-चित्र तुझ्या काळाचें तें स्मरतां ।
फाटतें हृदय कीं आतां ॥
(चाल) नच मिळे सुखाचा वारा ।
डोळ्यांस लागती धारा ॥
करुणा कर करुणागारा ।
हे भगवंता ! करुणा ही येवोनी ॥
शिवराया द्या धाडोनी ॥ ३

---

## २७ तीर्थरूपांस

( कवि:—श्री. नाथ निफाडकर )

अण्णा ! म किती कसें स्तवुं तुम्हां मातें कळेना मुळीं; ।
मी, माझें सगळें. असे व तुमचें आजन्म या लोकिचें. ॥

"संस्कारांहुनि थोर या जगति ना पुण्य स्वतांचें असे; " ।
ऐसें मी पण सांगतों; तुमचिया पिंडामुळें मी बळी ! ॥

माझें शिक्षण मी स्वतांच वरिलें, साऱ्या धरित्री-तलीं; ।
सारी संकटमालिका सहनही केली तपांच्या बळें; ॥

निंदेचें कटु वीखही पचविलें; शैथिल्य ना दाविलें; ।
कर्तव्यें करितां तुम्हांप्रत सदा प्रीतीच ठेवीयली. ॥

नाहीं मी पण थांब तों तुमचिया संपद्गुना कीर्तिसी; ।
कौटुंबीय हि कीर्ति ती मज गमे अत्यल्प संकोचिता. ॥

बुद्धीच्या वडवानळें सळसळे हृत्सागरीं शेषही—
प्रेमाचा; जणुं राहतो गंवसणी विश्वास घालावया. ॥

विश्वाच्या जरि कल्पना मम मना भांबावुनी टाकिती, ।
वेदांच्या पण आपुल्या शिकवणी देतील सायुज्यता ! ॥

———

# २८ दिव्यदर्शन.

( कविः—श्री. वि. ना. वाड. )

यंत्रापरि ते एकसारखे चालतात व्यवहार ।
प्रपंचांतले, त्यांचा येई कंटाळा मज फार ॥ १

सृष्टीचें सौंदर्य बघाया वेडी वृत्ति जहाली ।
लौकिक कर्तव्याची तेव्हां पूर्ण विस्मृती पडली ॥ २

हिरवीं कुरणें दिसलीं; छे! छे! मखमूचा गालीचा ।
कुणी पसरिला नयनमनोहर धरेवरी किमतीचा ? ॥ ३

पक्षिराज हे प्राप्त जाहले भाट खरे सृष्टीचे ।
त्या समयाला गीत गाउनी दावितात देवाचें ॥ ४

दिनकर तेव्हां कोमल किरणें फेंकितसे भूवरतीं ।
वाटे प्रभुचें हास्य पसरलें असेल खालीं, वरतीं ॥ ५

मौज पहाया पुढें निघालों, निर्झर झुळ झुळ वाहे ।
श्रवणमधुर रव परिसुनि तेव्हां मी आनंदीं पोहें ॥ ६

गाउं लागलों सहज सुखें मी मनोविनोदासाठीं ।
ऐकुनि मृदुगानाच्या ताना नाग एक ये दृष्टी ॥ ७

गानलुब्ध तो होउनियां, जणुं फणा उचलुनी सांगे ।
" कवे, वक्रता सोडुनि देई, मजशिं मित्रसम वागे ॥ ८

कुटिल दुष्ट जे लोक जगांतिल निष्कारण छळितात ।
दंश करुनियां दंडितसों त्यां, ऐशी अमुची रीत" ॥ ९

तत्त्व तदा मज कळे मना कीं " प्रेमचि जिंकि जगातें ।
सर्वांभूतीं समत्व धरितां अंगिं महत्पद येतें " ॥ १०

अशा विचारें पुढें चालतां मार्गीं पर्वत आला ।
दिसे गव्हरीं एक विभूती, " थांब " वदे ती मजला ॥ ११

स्तंभितमति मी विनम्र झालों, विनवीं तच्चरणांस ।
" उपदेशामृत द्या ऋषिवर्या ! मिळो मना संतोष " ॥ १२

" वत्सा, तुज जो बोध करिन त्याकडे असो अवधान ।
ईश-कृपेनें मिळेल तुजला सौख्य-विभव-सन्मान ॥ १३

सत्य वदावें नित्य तुवां, आतिथ्य जनांसी दावीं ।
अव्हेरी परकामिनीधनांतें आत्मोन्नति साधावी ॥ १४

समाधान हें सौख्य खरें बघ, त्याविण ' राजा ' ' रंक ' ।
तदभावीं जग दुःखपूर्ण हें उमज मनीं निःशंक ॥ १५

निवृत्तिचा पथ बिकट बहुत तो, बोलायाच्या गोष्टी ।
खचित नसति या, देह दंडुनी व्हावें लागे कष्टी ॥ १६

शाब्दिक बडबड दिसेल अवघड वेदांत्यांची तुजला ।
कळतां मग म्हणशील भोंदु हा घात कराया सजला ॥ १७

संसारीं तूं अलिप्त राहीं कमल जसें कासारीं ।
संन्यासास्तव केलि असे कां प्रभुनें सृष्टि हि सारी ? ॥ १८

गृहस्थाश्रमीं विपुल संधि तुज परहित तें करण्याची ।
आत्महिता ये संधि तशी ती प्रभुलाही स्मरण्याची ॥ १९

आशीर्वचना तुला देत मी, काव्यशक्ति तव लावीं ।
परोपदेशीं; तरी कीर्ति तव थोर जगीं या व्हावी. ॥" २०

ऐकुनि मुनिची वाणी प्रेमें नयनांतुनि ये पाणी ।
निरोप घेण्या पुढें पातलों; राहें जोडुनि पाणी ॥ २१

आनंदानें गृहा परतलों बोधरहस्य कळालें ।
' दिव्य दर्शनीं ' सारें माझें ' शंकाभूत ' पळालें ॥ २२

अशा विभूती जगांत विरळा; लोकहितास्तव वसती ।
भाव असे तरि बोध तयांचे सुगमपणानें ठसती ॥ २३

---

## २०. श्रीसमर्थ सद्गुरु

( कविः—द्वारकारमण )

अम्हि दीन रंक तुम्हि नाथ । अहो रघुनाथ ! ॥
महाराज ! हरुनि भव-दैन्य करा निजदास अनाथ सनाथ ॥ध्रु०॥

संसारिं गढलि मति सारी ।
प्रीति ही जडलि सुतदारीं ॥
लोपली नीति व्यवहारीं ।
गुंतली मति स्वार्थात सुचेना एक घडिहि परमार्थ ॥ १

परमार्थ सुचेना कांहीं ।
घडि एक चित्त हरि-पायीं ॥

न जडेचि कवणहि उपायीं ।
वाटतें स्वहित तें अहित, अहित तें गमे स्वहित निभ्रांत ॥२

निभ्रांत भ्रांत मन झालें ।
अंधत्व दृष्टिला आलें ।
अज्ञान-तमें वेष्टियलें ॥
परमार्थि दिसेना राम: दिसे तो कनक–युवति–लोभांत ॥ ३

लोभांत विसरलों रामा ।
जाहलों नित्य वश कामा ।
घडि घडि अनुताप रिकामा ।
क्षण अर्ध आठवे राम पुन्हा मन दंग विषय रंगांत ॥ ४

रंगांत काळ हा गेला ।
श्रीराम दिसेना डोळां ॥
दुष्कर्म जाहलें गोळा ।
होणार पुढें गति काय कळेना हरहर झाला घात ॥ ५

जाहला घात कळुं आला ।
पडणार यमाचा घाला ॥
तैं कोण तारि जीवाला ।
कामिनी–कनक सोयरेहि जिवलग कुणि न विषम काळांत॥६

कलिकालपाश तोडाया ।
तुम्हि समर्थ सद्गुरुराया ! ॥
झणिं करा कृपेची छाया ।
महाराज ! आदि परमेश्वर आपण श्रीसमर्थ रघुनाथ ॥

---

## ३० स्वातंत्र्यदेवतेस—

( कवि—पद्मविहारी )

स्वातंत्र्यदेवते गे । असशी जगीं कुठेंही ।
स्वातंत्र्य शाहिराचा । मुजरा तिथून घेई ! ॥

यश-घोषणा तुझी गे । करितीं दहा दिशाही ।
मम गोष्ट ती कशाला ? । तव भाट एक मीही ! ॥

तुझिया विशुद्ध तेजें । तरणी दिपून जाई ! ।
पावित्र्य थोर तुझें । गंगाजलींहि नाहीं ! ॥

सुमनांहुनी मृदू जी । वज्राहुनी कठोर ।
हृत्प्रेरणा त्वदीया । अनिवार्य ती अपार ॥

तव हास्य पाहुनीया । लाजेल चंद्रकोर ! ।
संध्या-उषा-मनींचा । हरलाच गर्वभार ! ॥

ओंवाळण्यास तूतें । ह्या तारका अधीर ! ।
सामर्थ्य ना कथाया । महिमा तुझा अपार ! ॥

नाशूनि पारतंत्र्या । नांदावया सुखांत ।
वसुनी भवानिमाजीं । तूं गाजली जगांत ! ॥

थैमान घालि जेव्हां । भुवनांत दास्य-दैत्य ।
होऊनि चंडिका तूं । वधिलेंच त्यास सत्य ! ॥

जेथें निवास तूझा । रमतेंच सौख्य तेथ ।
झणिं ये सुखी कराया । हा हिंद--भू नितांत ! ॥

त्या शूर मावळ्यांच्या । स्फुरलीस रोमरोमीं ! ।
खोऱ्यांदऱ्यांतुनी तूं । फिरलीस आर्यभूमीं ! ॥

भगव्या तशा निशाणीं । वसती तुवां करोनी, ।
केले विहार तूं ना ? । फडकोनि स्वैर व्योमीं ! ॥

वास्तव्य आज कोठें ? । चल ये पुनः स्वधामीं ।
होऊन जाउं दे हीं । नत मस्तकें प्रणामीं ! ॥

तुजवीण दीन पाहीं । ही हिंद–भू जहाली ।
खेळीव गे तियेच्या । गालीं गुलाबि लाली ! ॥

लावी टिळा स्वहस्तें । तीच्या अनाथ भालीं ।
लवुं दे शिरें जगाचीं । तत्पादपद्मयुगलीं ! ॥

स्फुरुं दे अम्हां मनीं ती । स्फूर्ति प्रभावशाली ।
दारीं तुझ्या उभा मी । ही एक भीक घालीं ! ॥

येथें तुला न कांहीं । कमती; वनें विशाल ।
तव शीर्षिं चामरांना । हे वृक्ष ढाळतील ! ॥

तैशा लता सदा ह्या । सुमनींहि पूजितील, ।
हा मंद मंद वायू । तव चित्त हांसवील ! ॥

मधु कूजनें खगांचीं । यश शुद्ध वानितील, ।
सरिता तुझींच गाणीं । गातील गे, सुरेल ! ॥

ऐश्वर्य भोगण्याला । येई त्वरें निघून ।
तुझ्याविना तयाचा । घेईल भोग कोण ? ॥

बलिदान वा हवें कां ? तेंही मुदें करीन ! ।
परि शर्मदे ! शुभांगे ! । ये ये झणीं निघून ! ॥

गगनांगणांत तारा । तदनंतरीं बनून ।
ऐश्वर्य मातृभूचें । बघुनी सदा हंसेन ! ॥

---

## ३१ वंदन बलवंता ("लोकमान्यांस")

( कवि:—मञ्जुमाधव )

वंदन बलवंता ! बलवंता ! । स्वातंत्र्य-देविच्या संता ! ॥ध्रु०॥

हिंदभूमि ही परदास्यानें दीना हीना झाली।
तुझ्या प्रतापें बुद्धिभास्करा सुकली कलिका फुलली ॥ १

कुरुसमरांगणिं वचन दिलें कीं करण्या तत्साफल्य ।
दुष्टनाशना धर्मपालना येइ स्वयं मांगल्य ॥ २

गीतामुरली तुवां घुमवितां हृदयें जागृत झालीं; ।
भारतवीरें क्लैब्य टाकुनी युद्धनीति अनुसरली ! ॥ ३

कारागारा स्वर्ग मानिलें शृंखलेस सुममाला ।
तुझ्या बंधनें निज देशाचा मोक्षकाल हा आला ॥ ४

सर्वस्वाला वाहुनि केली आत्मसुखाची होळी ।
स्वातंत्र्याचा मार्ग दाविण्या अम्हां दीपिका झाली ॥ ५

तुझी भरारी राष्ट्र-अंबरीं चंडोलासम गमते ।
रजनी सरतां भाग्यरवीला स्तविशी स्वागतगीतें ॥ ६

उपकाराची फेड,-कल्पना वेड भासतें मजला ।
भारत ओढिल जरि तव नामें स्मरणीं निर्झर माला ॥ ७

धवल यश तुझें हिमनग शीर्षीं प्रेमानें मिरवील ।
यौवन-देहीं रक्तबिंदुही तुझेच गातिल बोल ॥ ८

गुंफितील तव नाम सदोदित शाहिर सुंदर कवनीं ।
खड्गाच्या तालावर रमतिल शूरवीर तव गानीं ॥ ९

सर्व खरें परि तव मुक्तात्मा सर्व फोल मानील ।
स्वराज्यकेतू उज्वल जोंवरि गगनीं ना फडकेल ॥

× × ×

दावा देवा ! तो सोन्याचा दिवस झडकरी आम्हां ।
श्रीतिळकांचा स्मृतिदिन होइल खरा साजरा तेव्हां ॥

---

## ३२ शुभ चिंतन.

( कवि:—श्री. पां. गं. लिमये. )

सदैव घडो विजयलाभ भूपा।
कीर्ती असु गुणानुरूपा ॥ ध्रु० ॥
दीर्घ असो आयु तया संतानधन्या।
लव न शिवो वैकल्यच्छाया ॥
प्रजानुरंजनीं हो सदा विलीन।
सुजनशरण कुजनदमन ॥
विपदा नेउ लया दावु दया ठेवु नया।
हरु तापा ॥ १ ॥

---

## ३३ राष्ट्र–जननी

( कवि:—प्रभात )

( चाल—चपल मोहिनी गे; ताल–झपताल. )

राष्ट्र–जननीऽगे, बघोनि क्लेशी, आम्हां हिंदवासी
दावी निजपथाऽगे ॥ धृ० ॥

आम्ही ही हिंदसुत—परवचनेंही झुलत।
सोडुनीऽस्वपथा—आचरीऽअन्य गे ॥ १

सोडुनी कोपलव—मातृवचें जगभरीं।
स्वत्व हृदयीं विखुरी—जगतजननीऽगे ॥ २

दास हा कृष्णसुत—तुजसि प्रेमें स्तवित।
येवुनि झडकरी—उद्धरी हिंद गे ॥ ३

# भाग ४ था

## प्रेम, शृंगार इत्यादि

### ३४ लावण्यवतीस—!

( कवि:—श्री. धों. त्र्यं. कोचरगांवकर )

लावण्याची प्रणयमधुरा मूर्ति उद्यानिं आली ।
दृष्टिक्षेपें चलबिचलही मन्मनीं तैं जहाली ॥
तारुण्याचा बहर उफळे रोमरोमांमधोनी ।
ठावी कीं ना मदनरतिची गोड बाधा अझूनी ? ॥ १ ॥

डोळ्यामाजीं खळखळ करी तेज लीलावतीच्या ।
वाटे विश्वीं बरसति सरी शीतला चंद्रिकेच्या ॥
गालीं भालीं कच खिदळती गुंफुनी गोफ नाना ।
जाळें फेंकीं जणुं भुलविण्या कामची मानवांना ॥ २ ॥

बिंबोष्ठीच्या अधरिं भरली जान्हवी ती सुधेची ।
प्राशायातें अविरत मिळे धन्य त्या वल्लभाची ॥
हासे, लाजे, तलम पदरें झांकि वक्षःस्थळातें ।
सौंदर्यानें रमणि अपुल्या मोहवी ना कुणातें ? ॥ ३ ॥

जाशी बाले ! आणि मजकडे फेकुनी तूं कटाक्षा ।
लागे वेगें हृदयिं मम गे आग अन् होइ रक्षा ॥

## ३८ मोहिनीस—

( कवि—पद्मविहारी )

अयि मोहने ! हळुं चालतां उधळूनियां स्मितमौक्तिकें ।
मज भारुनी पथि, लाविलें हृदया पिसें चिर जें टिकें ! ॥

नयनांतल्या तव जादुनें जिथल्या तिथें क्षण थांबलों ।
तुज लोभलों ! परि भोंवतीं जन देखतां लव लाजलों ! ॥

इतुक्यांत तूं वळुनी जरा मज देखिलें हळुं चोरुनी ।
नव षोडशी अरुणप्रभावलि गेलि त्वन्मुखिं फांकुनी ! ॥

नयन क्षणीं नयनांप्रती भिडले ! अहा मन बावरें ।
स्मित मंद पाहुनि कायसें कथण्या तुला अधर स्फुरे ॥

चपले ! परी क्षणिं जाशि तूं निघुनि उरीं शर मारुनी ।
अधरींच तीं जिरलीं वचें ! जगणें निरर्थ अतां जनीं ! ॥

पडती किती जड पाउलें ! विकला तनू नच सांवरे ! ।
तम लोचनीं, हृदिं शून्यता, क्षण दिव्य तो सरतां, उरे ! ॥

*　　　*　　　*

सखि, लोपल्या मधु कल्पना ! पडणार ना परि विस्मृति !।
रमतों कसा तरि आणुनी मनिं रम्य ती तव आकृती ! ॥



## ३६ सज्जांतली मजा !

( कविः—श्री. नाथ निफाडकर )

( चाल—पंचकल्याणि घोडा )

बघ ही गोदेची गे मजा । सरली स्नेह्यांची ती सजा ।
घडिभरीं । मनीं आणी न कुण्याही काजा । ये अशी
गडे, सज्जांत करूं गे मौजा ।। १ ।।

थकली गाउन कोयळ गाणीं । आतां शांत रहा गे राणी ।
नभिं पहा । कशी ती कोर निघाली सानी ।
मज तुझीच भासे गहिरी गोजिर भगिनी ।। २ ।।

खालीं गोदा झळझळ वाहे । वरतीं चंद्रकोर झुलताहे ।
पण तुझी । जशी सज्जांत खुमारी पाहे । नच सुरां
कधीं ती गगनींही त्या लाहे ।। ३ ।।

———

## ३७ अबला.

( कविः—श्री. पां. गं. लिमये )

भुजबलें अबला उणी । मतिबलें अधिका नराहुनी ॥ ध्रु० ॥
'ज्या' करि सुचापनियन्त्रणा । अधीन सूचिहि करी गुणा ।
दुर्जय तरुणिस नसे कुणी ॥ १ ॥
सुविद्य सुशील असो कुलीं । तत्संयमिता करी लुली ।
नेत्रकटाक्षें नितम्बिनी ॥ २ ॥

---

## ३८ " प्रीतीचे बोल "

( कविः— फकीर. )

मधु बोल बोल बोल ग ! ।
" प्रीतीचे बोल बिनमोल ! " ॥
सप्तपदा कां कुठें चालुनी— ।
लग्नगांठ वा घट्ट बांधुनी— ॥
रूढि, धर्म ही पूर्ण करोनी— ।
मिळकत जिवा कां जोड ग ? ॥
" प्रीतीचे बोल बिनमोल ! " ॥
प्रेमपाश हें सोंग जगांचें ! ।
चोर सर्व हे स्वार्थ सुखाचे ? ॥

प्रेम सार जरि मधु जीवाचें— ।
कुणा लाभलें बोल ग ? ॥
" प्रीतीचे बोल बिनमोल ! " ॥

महाल, वाडे, भव्य मंदिरें ।
प्रेम नांदतें तेथ ना खरें; ॥
सौख्यभोग हीं खुळीं लक्षणें ! ।
मोल तिला नच तोल ग ! ॥
" प्रीतीचे बोल बिनमोल ! " ॥

प्रेम-भूल ती ! स्त्रीहृदयाचें, ।
कठोर दिल तें स्वार्थि नरांचे ! ॥
परें प्रेम तव मधु जीवाचें— ।
' काव्य देवते ! ' गोड ग ! ॥
" प्रीतीचे बोल बिनमोल ! " ॥

प्रेमा अंत न रंगरूपता ।
थकले कविही उपमा देतां ॥
जीवहि गेले अनंत गातां ।
अखेर ठरले फोल ग ! ॥
" प्रीतीचे बोल बिनमोल ! " ॥

बोल बोललों कृपाप्रसादें— ।
स्फूर्तीचे हे देवि शारदे ! ॥
नजराणे घे ह्या " फकिराचे " ।
असो नसो मुळिं मोल ग ! ॥
" प्रीतीचे बोल बिनमोल ! " ॥

———

## ३९ भृंग-कलिका.

( कविः—डॉ. द. ब. खाडिलकर. )

मी नेणें कोण्या वेळीं भृंगासि पंख हे फुटले ।
कलिकेला वारें आलें ॥धृ०॥

सृष्टीच्या सौंदर्यानें अंतर हें त्याचें फुललें ।
कोणाच्या मोहकतेनें भृंगाला डोळे आले ।
हें केव्हां कैसें झालें जणुं पाण्या भरतें आलें ॥
हृदयाला तापचि झाले ।
हें वेड कोणचें कुठलें भृंगाला अवचट आलें ॥ १ ॥
पूर्वींचें साधें घरटें भृंगानें सोडुन दिधलें ।
भृंगाला कैसे रुचले भलते हे चाळे असले ॥
भृंगाला पंखचि फुटले कलिकेला वारें आलें ।

ती कलिका होती साधी ।
मिटलेली मुग्धचि आधीं ।
तिज आली कुठुनी व्याधी ।

आधींचें मुख तें साधें झालें तें लालचि मोदें ॥२॥
डोले ती सलिलावरती सहजा स्त्री-लीला असती ।
कलिकेचें दल हें खुललें सौगंधें अंतर भरलें ।
अंतरंगि रस हे भरले वाहुनी मुखावर आले ॥

कलिकेसि तेज नव चढलें ।
बालिश ते चाळे गेले ।
युवतीचें डुलणें आलें ।

ठुमकत ती आतां चाले　डोळ्याला पाणी चढलें ॥३॥
" वल्लीचा हिरवा शालू　अंगावरि घालुनि चालूं ।
भृङ्गाला भरतें आणूं　प्रेमाचा तो रस जाणूं ।"
कलिकेला ऐसें वाटे　प्रेमानें अंतर दाटे ॥

" भृङ्गानें तेथें यावें ।
प्रेमानें जवळी घ्यावें ।
तें सौख्यचि हृदया द्यावें ।

कधितरी हळुच चुंबावें　कलिकेनें लाजुनि जावें " ॥४॥
भृङ्गानें वेडें व्हावें　कलिकेला जवळी घ्यावें ।
हे कोण कोठले चाळे　कैसे या भृङ्गा आले ।
कलिकचें मुख हें खुललें　भृङ्गानें सारें केलें ॥

हें प्रेम भृङ्ग-कलिकेचें ।
केव्हांचें जमलें साचें ।
कौशल हें हृद्य कुणाचें ।

मी नेणें कोण्या वेळीं　भृङ्गास पंख हे फुटले ॥
　कलिकेला वारें आलें ॥ ५ ॥

---

## ४० × × स

( कवि:—श्री. स. वा. निफाडकर. )

उसळून ये प्रीती वरी अडवून तूं जरि ठेविली ।
बघ भेदुनी हृदयास ती वदनावरी तव रंगली ॥

अडवील जो तिजला असा मज ना दिसे कोणी बली ।
श्रम हे वृथा तव लाडके ! चोरी तुला नच साधली ॥

जी चालवी सत्ता सदा हृदयावरी माझ्या तुझ्या ।
कळली तुला ती अन् मला; "नाहीं" किती जरि बोलली ॥

नच भेटतां बहुता दिनीं हुरहूर कां वाटे मना ! ।
कां जातसे कोमेजुनी वद तूंच ना ताजी कळी ? ॥

कां होतसे मन घाबरें मम दर्शनास्तव हें तुझें ? ।
प्रीती न का करि खेळ हे हृदयांत जी तव बिंबली ? ॥

न प्रीति तूं तरि चोरुनी कां पाहसी, अन् लाजसी ? ।
प्रीतीविणें हें हास्य कां ! वद होतसे गालीं खळी ! ॥

मन हें उताविळ हो जरी बोलावयास्तव बोलही ।
परि वेळ ती येतांच कां बोली मनांतच थांबली ? ॥
सुखवावया मजला सदा झटतेस; अन् सुख मानिसी ।
हो व्यक्त ही तव प्रीत गे, नानापरी जरि झांकिली ॥

## ४१ " गोड घे लकेरीतें—! "

( कवि —" दत्ताग्रज— ) "

गझल्–(चाल:- सब् हसिनोमें तरादार बने बैठे है। )

तूंच रूपसम्राज्ञी, एक या जगीं बाले; ।
पाहुनी तुझ्या रूपा, स्वर्गि अप्सरा लाजे ! ॥ ध्रु० ॥

हास्य-पुष्प जें गालीं हांसलें क्षणापूर्वी- ।
शांत शांत या काली बंद ओष्ठिं तें होई ! ॥

श्याम कुंतलाखालीं पाणिदार हे डोळे ।
-डोलतात कासारीं काय पद्म हिंदोले ! ॥

जीव मोहुनी गेला भान ना उरे कांहीं ।
दिव्य या क्षणांची कां मोजदाद ना गांवीं ! ॥

देखुनीहि सौंदर्या वेड लागतें जीवा ।
निंदिताति लोकीं: मी ना करीन ती पर्वा !; ॥

*    *    *    *

गोड मुक्तकंठानें गान एकदां गाई, ।
ऐकुनी तया वृक्षीं कोकिलाहि थांबावी; ।

सूर गोड गाई ते जीव त्याविना वेडा ।
मुग्धता कशा बाले, सोड व्यर्थ हा तेढा !

शांत वात होईना; नाचती जशीं पानें ।
लुब्धता जडे जीवा; वेड लावितें गाणें. ॥

साथ द्यावया बाले, मंजुला तुझ्या गाना ।
सृष्टि कौतुकें छेडी, गोड निर्झरी-वीणा ! ॥

एकदां फिरोनी त्या गोड घे लकेरीतें ।
आळवीं म्हणोनी मी गोड गाउनी गीतें:

---

## ४२ पसरिं पसरिं प्रणयजाल.

[ कविः—श्री. स. वा. निफाडकर ]

पसरिं पसरिं प्रणयजाल सुखद जें जिवाला ।
अधिर अधिर अधिर किती जीव हा जहाला ॥ ध्रु० ॥

प्रणयाच्या बघ पाशीं ।
निगडित करि अरुणासी ।
सतत सुखद म्हणुनि हृदय तोहि दे उषेला ॥ १ ॥

विरहीं संध्यारमणी— ।
पाहुनियां, हा तरणी ।
हळुच जवळ ओढुनियां, चुंबितो मुखाला ॥ २ ॥

क्रीडताति विधुरजनी ।
भय, शंका हीं त्यजुनी ।
रुचिर रुचिर बघ सखये खेळ चाललेला ॥ ३ ॥

नलिनी मधुकर जोडी ।
लतिका तरुतें वेढी ।
मधुर मधुर संगम हा सुखवितो मनाला ! ॥ ४ ॥

प्रेमानें जग भरलें ।
मीं तूं विसरुनि गेलें ।
चल होऊं एकजीव, उशिर तो कशाला. ॥ ५ ॥

---

## ४३ गोदा उतरतांना.

( कवि:—नाथ निफाडकर )

टाक पदा हळुवार ॥ बाले ॥ ध्रु० ॥
अलि या नाहीं मगर तरीही । कमर तुझी सुकुमार ॥ १
नच कोठेंही डोह तरी हा । मोह तुझा अनिवार ॥ २
नच खालीं कीं वरतीं पाहूं । घे माझा आधार ॥ ३
अलि आपण शेवाळ टाळिलें । जवळ असे बघ तीर ॥ ४
पर दगडी सांभाळ तेथली । दिसती भंवरे फार ॥ ५
पुढतीं येई सावरीन करिं । खडकावर उडि मार ॥ ६
सत्प्रेमाची गोदा उतरूं ! सहवासें क्रमवार ॥ ७

---

## ४४ प्रीतीची तलवार.

कवि:—मनोहरमाधव

The love, Oh Beloved, is a keen-edged sword !
—*Deshbandhu Das.*

प्रीतीची तरवार तीक्ष्ण ! सरले, घायाळ केलें मला ।
माझें प्राशुन रक्त रात्रिं दिवसा; हा जीव वेडावला ! ॥

माझ्या या हृदयांत खोल रुतला तलवारिचा वार ना ! ।
प्रेमाच्या जखमेंत सौख्यच परी, आनन्द वाटे मना ! ॥

प्रीतीची तुलना न शक्य करणें ! प्रत्यक्ष ती नागिण– ।
सर्वाङ्गा कवळून घट्ट जखडी जीवास या ग्रासुन ! ॥

जिव्हेच्या मधुनी भयानक तिच्या ज्वाळा उफाळे वरी ।
ज्वालेनें मम जीव दग्ध करुनी; नाचे हि रक्षेवरी ! ॥

क्रूरा वाघिण काय तूं जिवलगे ! ठावें न कांहीं मला ।
तेजस्वी तळपेच नेत्रयुग हें, हा जीव भाम्बावला ! ॥

घेशी झेंप जरी अतां मजवरी हा जीव नाशावया– ।
आहे हा तुजलाच अर्पण गडे !–चुम्बीन मी स्वेच्छया ! ॥

स्वेच्छेनें कवळीन गे तुज सखे ! सप्रेम आलिङ्गुन ।
कोणींही तलवार तूं अस गडे ! नागीण वा वाघिण ! ॥

## ४९ तूं०

[ कविः—श्री. ग. ल. ठोकळ. ]

तूं माझी हरिणी खरोखर तुझे डोळे टपोरे तसे ।
चित्ताच्या कुरणामधीं विहरसी निःशंक तूं राजसे ॥

गोरा रंग तुझा, मनोहर गती, तूं राजहंसी खरी ।
घेसी मज्जन सारखी हृदयिंच्या निःसीम तूं सागरीं ॥

भारी मंजुळ लाडके तव गळा, तूं गोडवी कोकिळा ।
केला मी तुजला बहाल पुरता माझ्या मनाचा मळा ॥

तूझ्या ठायिं सुशांत तेज विलसे, ताराच गे तूं खरी ।
माझ्या अंतरिंच्या अफाट गगनीं तेजाळसी तूं पुरी ॥

अंगीं यौवन हें तुझ्या बहरलें, झेलाच तूं काश्मिरी ।
भारी कोमल तूं जणूं तुळशिची हेलावती मंजिरी ॥

पाडाचें फळ तूं, तुझें निथळतें लावण्य अंगांतुनी ।
तूं ओली हिरवी सुरेख हरळी, तूं नम्रतेची खनी ॥

प्रेमाचें मनिं चांदणें फुलविसी, तूं अक्षयी पौर्णिमा ।
तूं माझी सहधर्मिणी, तुज पुढें नाहीं जगाची तमा ॥

---

## ४६ " एम् " कडून " एन् " ला

( कवि:---श्री. नाथ निफाडकर )

मजसी किती कृपाळू सखया तुम्ही जहाला; ।
इतुका कधीं दयाळू जगतीं कुणी न झाला ! ॥

कुणि वांच्छिलें तनूची मज आरती कराया ? ।
पण या तुझ्या मनाची सगळी गती अगम्या ! ॥

तुजसी तयार होतें पण तूंच लाजवीलें; ।
' कवडीच मोल देहा ' सजणेंच बाणवीलें. ॥

मम कस्तुरी मनाची मज तूंच दावियेली; ।
रमणा तुवांच गीती हृदयांत खेळवीली. ॥

इथुनी तिथोनि सारा जगतांत तोच वारा, ।
पण तो तुझाच पावा मज नाचु लावणारा ॥

सगळीच चाल माझी बुबुळें तुझीं करीती ।
तव मूक भाषणेंही मज गीत गाववीती ॥

पण एकदांहि देवा, मज लाधलास नाहीं; ।
जरि एम् नि "एन्" मधें तो नसतो दुजा कुणींही ! ॥

### "एन्" कडून "एम्" ला

तुजसी कधीं कृपाळू सखये, मुळीं न झालों; ।
उलटा तुझ्या दयेनें बघ शांत मीच झालों ॥

कुणि वांच्छिलें तनूची तुज आरती कराया।
मज तूंच सांगसी हें- तव रीत ही अगम्या ! ॥

मज तूं तयार होसी आणि मी तुलाहि होतों।
म्हणुनीच देहिं गेला सुटुनी अ-पाप जो तो. ॥

तव कस्तुरी मनाची मज तूंच अर्पियेली;।
रमणी तुवांच गीतीं मम कंठिं खेळवीली. ॥

इथुनी तिथोनि सारे गगनांत तेच तारे,।
पण या तुझ्याच तेजें नभ दीप्तिमंत सारें ॥

इथुनी तिथोनि सारी गति तूंच चालवीली;।
तव रीत ना अजूनी कुणि पूर्ण चिंतियेली; ॥

पण एकदांहि देवी ! मज लाधलीस नाहीं;।
मग "एन्" अर्णीक "एम्" हीं तुज वेगळीं सदाही ? ॥

---

## ४७ प्रेमप्रश्नमाला.

( कविः—मनोहरमाधव )

सौंदर्याच्यासाठीं मजला वरिसी कां प्रेमला ? ।
छे नको तुझें प्रेम तें मला ॥

सौंदर्याची सृष्टि-सुंदरी-प्रतिमा ही हांसते ।
तुझें तें प्रेम वाहि गे तिथें ! ॥

तारुण्याच्यासाठीं मजला वरिसी कां प्रेमला ? ।
छे नको तुझें प्रेम तें मला ॥

तारुण्याची सरित्सुंदरी प्रतिमा ही हांसते ।
तुझें तें प्रेम वाहि गे तिथें ! ॥

रत्नांची मी राणी म्हणुनी वरिसी कां प्रेमला ? ।
छे नको तुझें प्रेम तें मला ! ॥

रत्नाकरिं त्या रत्नमया ती जल-देवी डोलते ।
तुझें तें प्रेम वाहि गे तिथें ! ॥

जरि प्रेम करिसि तूं सखया माझ्यावर ।
नच रूप गुणास्तव परि प्रेमाखातर ।
मग तेंच प्रेम मज प्यार अती सुंदर ।

खुशाल विंधी प्रेम-शरानें मजला तूं मोहना ।
मग घेइ चुंबना, अर्पण सारें तुला ! ॥

———

## ४८ भावतरंग

( कवि:—पद्मविहारी )

हंसत हंसत विश्व धवल करित येइ बाले ! ॥ ध्रु० ॥

दिव्य उषा-हास्य मधुर ।
तारांचें लास्य रुचिर ।

कीं संध्या-राग स्वैर वदनिं तुझ्या खेळे ! ॥ १ ॥

तव श्वासांहूनि अमल ।
पुष्प-गंध नाहिं विमल ।

त्या श्वासें मंदानिल सौरभयुत झाले ! ॥ २ ॥

कुसुमांची कोमलता ।
उपवनिंची अभिनवता ।

पाहुनि तव मृदुतरता आनंदुनि डोले ॥ ३ ॥

देखुनि तव नेत्र-युगल ।
भृङ्ग धाव घेति सकल ।

परि होतां हेतु विफल कचपाशीं दडले ! ॥ ४ ॥

नूपुर रव रम्य घुमति ।
विस्मित हो वीणावति ।

शुचितम तव बघुनि द्युति हृदयिं भाव स्फुरले ॥ ५ ॥

मंजु-मधुर शब्दमिषें ।
दिव्य सुधा जणुं वरुषे ।

धूलिपथहि पदस्पर्शें स्वर्णमय जहाले ! ॥ ६ ॥

मुग्ध-मृदुल-दिव्य गान ।
ऐकुनि त्वन्मधुर तान ।

हरलें बघ, देहभान चतुर चारुशीले ! ॥ ७ ॥

प्रेम-ओघ सरल-शांत ।
तव वदनीं मधु नितांत ।

वाहतसे सखि ! अविरत मानस मम धालें. ॥ ८ ॥

जैं गुलाब-पुष्प खुडित ।
कंटक मज बोंचतात ।

सुम-कंटक भिन्न करित । झणिं येई विमले ! ॥ ९ ॥

कृत्रिमता-लघु-गुरुता ।
लवहि नुरे जगतिं अतां ।

तव कटाक्ष सखि ! पडतां विश्व दिव्य झालें ! ॥१०॥

देवताच स्वर्गीतलि ।
पातलिसे भूमितलीं ।

भाग्यवंत मीच सकलिं । दर्शन तव झालें ! ।



## ४९ समुद्राच्या कांठावर बसून

( कविः—डॉ. द. ब. खाडिलकर )

महोदधीच्या कांठावरची आनंदी लहर ।
आकाशांतिल चकाकणारी चंद्राची कोर ॥ १

निशादेविच्या विभूषणांतिल रत्नमया टिकल्या ।
पाण्यावरच्या झुलत्या जागीं रमण्याला आल्या ॥ २

प्रासादाच्या शिखरावरची लकेर गाण्याची ।
स्वैरपणानें विहरत गेली वाऱ्यावर साची ॥ ३

सृष्टिदेविचीं मोहक बाळें हीं सगळीं होतीं ।
झाली माझी तयांसारखी आनंदी वृत्ती ॥ ४

अंगावरतीं धवलरसाच्या धारा गाळीत ।
चंद्राजवळी सुबक चांदणी लाजे गगनांत ॥ ५

कधीं दिसावी, पुन्हा लपावी तेजाची ज्योत ।
अंतःकरणीं पुरा ठसावा प्रेमाचा स्रोत ॥ ६

लपंडाव हा प्रेमाचा कीं रागाचा, तारे ! ।
सांग उघडलीं केव्हां तुझिया प्रेमाचीं दारें ॥ ७

उदधिनभांच्या संगमभागीं शुभ्र मेघ चमके ।
त्याच्या वरची छटा सांवळी घेत असे झोके ॥ ८

गभीर उदधी, शांत चंद्रिका, अल्लड ती तारा ।
चंद्र विलसता, मेघ वाहता उदधि नाचणारा ॥ ९

मी बघणारा, प्रासादींची गाणारी देवी ।
सृष्टिदेवते ! अघटित करणी किति तव वानावी ॥ १०

खिळली दृष्टी लाटांवरती; तरलपणा गेला ।
महोदधीच्या सान्निध्याचा पडताळा आला ॥ ११

तंद्री लागे, क्षणांत भंगे; लाटांचा खेळ ।
श्रमती, रमती पुन्हा खेळती प्रेमाचा खेळ ॥ १२

सर्वस्वाच्या आनंदाच्या प्रीतीची ओढ ।
महोदधीच्या ओठावरची लाटेची मोड ॥ १३

अशीच लाजो, अशीच मुरडो, प्रेमाची खूण ।
महोदधीच्या अनंत उदरीं राहे सांठून ॥ १४

*　　　*　　　*　　　*

गुणी जनांच्या हृदयिं भावनागण निर्मल नाचे ।
आनंदाची लहर तिथूनी भंवतालीं चमके ॥ १५

त्या चमकेचें पाणी दिपवी, डोलवि जगतासी ।
महोदधीच्या भंवतालींही तशी दीप्ति खाशी ॥ १६

हृदयीं उठले मनांत भरले काव्याचे बोल ।
सत्तत्वाची जोड मिळाली ‘ जोराचा बोल ’ ॥ १७

त्या जोडीनें तनुवर उठली मोदाची लहर ।
थरारले रोमांच चालली नेत्रांची सफर ॥ १८

प्रभा फांकली दिसूं लागला तत्वांतिल जीव ।
पटूं लागला मनास त्याच्या प्रभेतला जीव ॥ १९
जीव चकाके आत्म्यामाजीं लीनच होऊन ।
आत्मसुखाची साक्ष वाटली सत्यचि येथून ॥ २०

शांत वाटलें शीतलतेनें आली तन्मयता ।
भान हरपलें महोदधीच्या बघतांना लाटा ॥ २१

महोदधीचा फेंस बघूनी थबथबलें हृदय ।
त्या पाण्यानें जाणिव विरली आनंदें काय ? ॥ २२

अनंत उदधी, अनंत लाटा, अनंत मन माझें, ।
अनंत आत्मा माझा तळपे, साज त्यास साजे ॥ २३

अशा स्थितीच्या प्रभेभोंवतीं वारा जोरानें ।
कानांभवतीं भरभर वाहे सृष्टीचें लेणें ॥ २४

जड सृष्टीची जाणिव वाटे; परत फिरे हृदय ।
शांत जाहले अवयव माझे, झालें हें काय ? ॥ २५

दृष्टि निवाली हळू हळू मग देहभान आलें ।
दिसों लागली सारी सृष्टी तरल नेत्र झाले ॥ २६

*  *  *  *

जड सृष्टीवरि स्वर्गवास हा खास असें झालें ॥

## ५० निराशा

( कवि:—पद्मविहारी )

दशदिशा जाहल्या ओस मला ह्या भुवनीं ।
उरलें न जिवलगे ! जिवलग आतां कोणी ! ॥
जतविलें जिवाचें पाणि जयां शिंपोनी ।
ते आशा-तंतू टाकुं नको तोडोनी ! ॥
मज तूंच पाजिला प्रेमरसाचा प्याला ।
तो क्षणार्धांत परि कसा विखारी झाला ! ॥
अवमान साहिले, नत्र गणिलें विपदांना ।
सखि ! भुलुनि तुझ्या त्या गोड गोड वचनांना ! ॥
होउनी भिकारी आस धरुनि मनिं मोठी ।
तव दारिं उभा मी एका शब्दासाठीं ! ॥
त्या एका शब्दें स्वर्ग इथें येईल ।
ह्या वृत्ति बावऱ्या उल्हसिता होतील ! ॥
दे खुशाल लोटुनि, हृदय वाहिलें चरणीं ।
उरलें न जिवाला जिवलग आतां कोणी ! ॥

---

## ५१ हुकुमाखातर

[ कवि:—श्री. केशव श्रीपाद कानेटकर ]

( चाल:—चन्द्रकान्त राजाची कन्या० )

चला सयांनो, चला झडकरी अंगण सारवलें ।
रंगवल्लिका काढूं या जी शोभवि गृह अपुलें ॥ १

बघुनि वदे मज अल्लड बाला अष्टादशवर्षा ।
गालीं दाबुनि उसळत उठल्या हृदयींच्या हर्षा. ॥ २

“ तुमचा काव्यप्रवाह वाहे अखंड सर्वपरी ।
रंगवल्लिकेवरी येउं द्या;-ती नच पुसणारी. ” ॥ ३

हुकूम हंसरा ऐकुनि उठलें विचारकाहूर, ।
वदन रंगलें, भ्रुकुटि आखडे; हा एक विचारः— ॥ ४

“ कृष्णकवीनें[1] केला पावन पाउल टाकून, ।
रामहि[2] गेला तेथें जाउनि सर्वा हसवून. ॥ ५

“ कसा जाउं त्या प्रांतीं शुचितर नसतां मी पात्र ? ”
अप्रत्यय हा मनांत उरवी धैर्य न अणुमात्र, ६

वदे तिला मी अवकाशानें असतां तल्लीन ।
रांगोळी काढण्यांत, “ बाले, देइ जरा कान ” ॥ ७

“ देवांना जें जमलें नाहीं आर्ये ! तें करिसी, ।
निर्मुनि अनुदिनि “स्वर्भूसंगम” धन्य धन्य होसी ! ॥८

“ भूवरि नुसती नव्हे स्वर्गिंही सत्ता गाजविशी ।
म्हणून मजला आर्ये ! गमसी कोणि देवतासी ! ॥ ९

“ राजाज्ञेनें क्षुद्र शिपुरडा कुठेंहि संचरतो, ।
ईशाज्ञेनें स्वर्गसुखांमधिं नर लोळूं शकतो ! ॥ १०

---

१ केशवसुत ( यांची “ रांगोळी घालतांना पाहून ” पहा )
२ गोविंदाग्रज ( यांची “ रांगोळी घातलेली पाहून ” पहा )

तुझीच आज्ञा मजला देवी ! दिव्य देशिं नेई, ।
दिपवितसे तेथील नवाई, बहु मज नवलाई. ॥ ११

त्वत्कृत भूद्यौसंगम सुचवी स्वर्भूसंग मला. ।
' साध्याही विषयांत' गवसला 'आशय' हा कविला.। १२

" वस्तुवस्तुंतिल संगम समता मनास नच देई, ।
स्वर्भूविचारविनिमय आज्ञारूपें सुखदायी. ॥ १३

" रंगवल्लिका कारण केवळ संवादा झाली ।
प्रियतम तेणें मज ती; नाहीं ती द्युति उडुजालीं ॥ १४

" क्षितिज दाखवी रेखुनि संगम भूचा स्वर्गाशीं ।
रांगोळी करि निकट भूचरा या स्वर्देवीशीं ॥ १५

" क्षितिजाठायीं दिसता संगम टिकेल चिरकाल, ।
संगम अमुचा असे तसा ज्या भय न घालि काळ ?"॥१६

———

## ५२ यौवन-विलास

[ कविः—विनीत ]

अर्धांगा लपवी जलांत विहरे नारी मनोहारिणी ।
फेकी नेत्र-कटाक्ष तेथ बनती तारा नभीं उज्वला ॥
प्रेमाची वसती असेल हृदयीं, उर्मी विलासी दिसे ।
होई कम्पित सर्व शांत जल हें जीवन्मृता औष दे ॥ १

* * *

ओठांच्या निकटीं कशास धरिलें हें पुष्प तूं, साजिरे !।
दातांनीं मग ती हळूंच चुरली कां पांकळी गोड, गे ! ॥;
ओष्ठांची तुलना फुलांशि करितां संतप्त गे होउनी ।
साऱ्या कुंदकळ्या मनोज्ञ वदनीं तूं दाविसी, मानिनी ॥ २

* * * *

प्रीतीचीं सुमनें नकोत मजला आणी नको मौक्तिक ।
डोळ्यांचीं सुभगे ! सुरम्य किरणें फेकूं नको आणिक ॥
नाचे जी बहुगोड लाज अधरीं, गालीं, तिला सावरीं !।
स्वर्गाशीं समतुल्य प्रेम-धन हें ठेवूं कुठें मी तरी ? ॥



# भाग ५ वा.

## मुरलीगीतें.



### गोपालकृष्ण भगवान्

[ कविः—रा. ब. खाडिलकर ]

( चालः-श्रीविश्ववंद्यगणराज )

गोपाल कृष्ण भगवान्। वाजवी मुरली ॥ ध्रु० ॥

श्यामकांति पीतांबरधारी।
मुकुटशिरावरि वेणू अधरीं।
ये रे यमुना-तीर-विहारी।
सखया वनमाली। वाजवी मुरली ॥ १

वेणूचा रव पडतां श्रवणीं।
पशु-पक्ष्यादिक आले धावुनी।
नर-नारी निज काम सोडुनी।
ऐकाया जमली। वाजवी मुरली ॥ २

मुरलि मनोहर साच मुरारी।
अविट सुखा दे कुंजविहारी।
वानुं मुखें किति तिची माधुरी।
वाणी ही विरली। वाजवी मुरली ॥ ३

वेणु-रवें या गृहदाराचा ।
पडला विसरच सकलां साचा ।
पूर हरी ये प्रेमरसाचा ।
मति माझी मुरली । वाजवी मुरली ॥ ४

त्यजुनि समाधी योगी आले ।
हरि-वेणूनें वेड लागलें ।
सगुण-सांवळ्या रूपीं रमले ।
अंतरिं ही भरली । वाजवी मुरली ॥ ५

तव माधुरिनें मति मोहियली ।
तुझ भेटाया उत्सुक झाली ।
प्रेम-जलीं जणुं लहरी विरली ।
हृदयकळि खुलली । वाजवी मुरली ॥ ६

नंद-नंदना सारसनयना ।
करि मुरलीच्या मंजुळ गाना ।
अर्पितसे पदिं राम प्राणा ।
आस मनीं उरली । वाजवी मुरली ॥ ७

——:o:——

## ५४ प्रभु गोपाला.

( कविः—पद्मविहारी )

प्रभु गोपाला ! वाजवि तव मधु मुरली,
मनिं आस दुजी नच उरली ॥ ध्रु० ॥
मज लागलिसे श्रवणाची मधु तृष्णा, लपलासि कुठें श्रीकृष्णा ! ॥
ह्या संसारीं तगमगतो मज्जीव, एकदां मुरलि वाजीव ॥
तव मुरलीनें चित्त चोरिलें माझें, कां तुजला पडलें ओझें ? ॥

करुनियां कंठ तव मुक्त ।
गीताचें गाई सूक्त ।
मुरलींतुनि मंगलयुक्त ।
जी कुंजवनीं कानिं एकदां पडली, ती मंजुल वाजवि मुरली. ॥

तव तेजानें सर्व भुवन हें भरलें, चंद्र-सूर्य गगनीं थिजले ! ॥
स्वर पंचम हा धरितो शीतल वारा; तारका छेडिती तारा ! ॥
मधु मुरलीची होई जेव्हां साथ, मग नुरतें द्वैताद्वैत ॥

स्वर्गीं बघ दाटी झाली ।
तुज राधा विनवूं आली ।
तरि कां न वाजविशि मुरली ! ।
चिच्छक्ती ही जींतुनि जगतीं स्फुरली, मधु-माधव ! ऐकिव मुरली.

तव मुरलीचा मंजुल रव ऐकोनी, त्रिभुवनही गेलें झुलुनी ! ॥
बघ, पुष्पांची वरतुनि वृष्टी झाली, तारका-फलेंही खुललीं ! ॥
त्या गोकुलिं ही लकेर कानीं पडली, तीनेंच वृत्ति मम हरली ! ॥

गोकुलिंच्या निर्मल बाला ।
तव पायीं घेती झोला ! ।
त्वत्स्वरूप आत्मा झाला ! ।

किति पाहसि रे अंत माधवा ! आतां, वाजीव मुरलि श्रीकांता ! ॥

शुचि गोपी ह्या मीही साधी राधा; मुरलीची होई बाधा ! ॥
तम-जंजाळीं बुडनी बघ ह्या गोपी, गोविंदा ! गेल्या झोंपीं ॥
परि मुरलीनें हृदयीं जागृति आली, कायमची नीज निमाली ॥

तूं मुग्ध पुष्प मी भृङ्ग ।
बघुनी तव नाना रंग ।
उठती मम हृदयिं तरंग ! ।

मज सेवूं दे संतत मधु वनमाली ! वाजवूनि अपुली मुरली. ॥

जरि वाजविशी मधु मुरली हृदयेशा ! पुरतील जिवाच्या आशा !॥
मग आतां कां विलंब ? रे वेल्हाळा ! चालूं दे मंजुळ चाळा ! ॥
मज डोलूं दे चिदानंदिं गोविंदा ! मी तुझ्या लागलें छंदा ॥

झणिं मुरलि अशी वाजीव, ।
मृत हृदयां करिल सजीव ! ।
धन्य ! धन्य ! म्हणतिल जीव ।

मनमोहन ती अखंड वाजवि मुरली, प्रभु आस दुजी नच उरली ! ॥

———

## ५८ पुरे कर मुरली.

( कवि:—मोरेश्वर )

पुरे कर मुरली । मुरली गोविंदा ! ।
नसे कां इतर तुला धंदा ? ॥ १

सारखी मुरली । मुरली वाजवुनी ।
टाकिली जिवासि मोहवुनी ॥ २

पडतां रव कानीं । कानीं मुरलीचा ।
उडाला दाब मनावरचा. ३

न सुचे घरकाम । घरकाम न कांहीं ।
बावरे चित्तवृत्ति पाही. ॥ ४

हरपुनि देहाचें । देहाचें भान ।
लागलें तुझ्याकडे ध्यान. ॥ ५

सहजच मग येण्या । येण्या तुजपाशीं ।
धांवलें पिसाट जणुं साची ॥ ६

येउनियां जवळी । जवळी श्रीरंगा ! ।
लोभलें तुझिया सत्संगा. ॥ ७

पाहुनि मज ऐशी । ऐशी स्वच्छंदा ।
कराया धजतिल जन निंदा. ॥ ८

आवर ही जादू । जादू मुरलीची ।
पडूं दे उमज परिस्थितिची. ॥ ९

पवढी विनती । विनती दासीची ।
दयाळा ! ऐकावी साची. ॥ १०

## ५६ अजी पंचमी रंग खेळावयाची.

( कविः—श्री. रामचंद्र बळवंत ग्वाडिलकर )

अजी पंचमी रंग खेळावयाची ।
हरी-रंगिं रंगोनिया जावयाची ॥
हरी-भक्तिचा रंग हा एकमेकां— ।
वरी टाकण्यासी तुम्ही लाजतां कां ? ॥ १

हरी-रंगणीं रंगुनी रंग खेळूं ।
सुखें खेळुनी ऐक्य-भावेंच डोलूं ॥
हरी-रूपिं "रंगेल" जो होइ साचा ।
निजानंद भंगेल कैसा तयाचा ? ॥ २

दुरी सारुनी सर्व संसार-बंध ।
हरीच्या कृपें पायिं राहूं अभंग ॥
सदा भक्तिभावें मनीं होउं दंग ।
जगीं राहुनी खेळ खेळूं असंग ॥ ३

करूनी शुचिर्भूत हृन्मंदिरास ।
अहो रंगवा या सुरंगें तयास ॥
असो चित्सुखाचा सदा तेथ वास ।
करी हो तरी तेथ "श्रीरंग" वास ॥ ४

हरी-रंग हा रक्त वा श्वेत नाहीं ।
नसे नील वा श्याम वा मिश्र कांहीं ॥
असे सोनियासारिखा शुद्ध भारी ।
उडूं द्याच तो नित्य कल्याणकारी ॥ ५

नका हो पळूं रंग पाहोनियाच ।
नका हो भिऊं रंग टाकावयास ॥
सदाचार हा नीट बांधोनि चंग ।
चला, पाहतां काय ! टाका सुरंग ॥ ६

अहो पंचमीचा असे पीत रंग ।
असे सर्व रंगामधीं तो सुरंग ॥
स्वयें रंगुनी रंगवाया जगाला ।
सुखी होउनी सौख्य द्या हो तयाला ॥ ७

हरीच्या अशा रंगिं रंगोनि गेले ।
शुकादी महायोगि जे मान्य झाले; ॥
मनीं भाविजे "रंगनाथा" सदैव ।
उणें काय होईल तुम्हास दैव ॥ ८

अतां सोडुनी सर्व हीं बाह्य ढोंगें ।
हरी-रंगिं संपूर्ण रंगूं निजांगें ॥
तयें लोपती संसृति-क्लेश सारे ।
वदे राम "श्रीरंग-रंगीं" रमा रे ॥ ९

---

## ५७ वाजवूं नको माधवा.

( श्री. सोपानदेव चौधरी )

वाजवूं नको माधवा तुझी ती जादूची मधु मुरली ।
गोपिगोपहि धन्य झाले ।
पिउनियां ते प्रेमप्याले ।
त्या गोड भावना आज निमाल्या कलिरायाच्या काळीं ॥ १

मुरलि गानाची रसिकता ।
काय जाणे दीन जनता ? ।
संसार यातनांचीं रडगाणीं गातां गातां शिणली ॥ २

मुरलि नादाची मधुरता ।
काय जाणे मत्त जनता ? ।
बांगडीं आणि कल्दार याच वाद्यांच्या नादीं मुरली ॥ ३

मुरलिनादीं लीनमतिता ।
काय ठावी ढोंगि संता ।
हे तुझ्या नांवचा शंख फुंकुनी हातीं घेती झोळी ॥ ४

ध्यान धरुनी ध्याति तुजला ।
मूर्तिचा तव विसर पडला ।
"जय राम कृष्ण हरि" भजन होत परि भुतें अंतरीं शिरलीं ॥५

गाउनी तव मुरलि-गीतें ।
चित्तशुद्धी काय होते ? ।
हे कवि स्वताची पुंगि फुंकिती फुकाचि या अवनि-तलीं ॥६

रडें येई अश्रु नाहीं ।
हास्य येई मोद नाहीं ।
चहुंकडे पहा तव प्रीतिविना शरिरांचीं प्रेतें बनलीं ॥ ७

दाखवाया ढोंग अजुनी ।
ह्यावरी भूतेंच बनुनी ।
ह पहा पुनरपी स्मशानांतलीं गाणीं गातां रमलीं ॥ ८

कठिण ऐशा घोर कालीं ।
वाजविशि कां व्यर्थ मुरली ।
छे नको नको त्या गोपगोपि तुज हंसति गालिंच्या गालीं॥९

विनवण्या माझ्या जिवाच्या ।
लहरि मुरली-वादनाच्या ।
ध्वनि लेखन-यंत्राच्या आधारें उठल्या ज्या हृत्पटलीं. ॥ १०

---

# भाग ६ वा.

## करुण.

—:०:—

### ५८ देवानें दिली-नी-देवानें नेली*

( कविः—रा. ब. दा. ग. पाध्ये. )

शुभ्र-विमला वस्त्रांत झांकलेली, ।
उणी मोहकता तरि न जिची झाली, ॥
सृष्टिदेवीच्या अतुल चतुरतेची ।
एक पाहिलि मीं कृती कुतुहलाची ॥ १

दृष्टि पडतां नयनांस वेधणारी, ।
विचारांच्या शतिं हृदय भेदणारी, ॥
भुवन आकुल कीं सकल करायाला, ।
ख्चास अवतरली करुणता धरेला ! ॥ २

दोन कुळिंची धन्यता साधण्याला, ।
सुभाग्याचा संसार थाटण्याला, ॥
चिमुकलें हें स्त्रीरत्न उदयिं आलें ! ।
कितिक आशांचें मधुर केंद्र झालें ! ॥ ३

---

* ही कविता सी. लॅंब ह्या आंग्ल कवीच्या " On an infant dying as soon as born " ह्या कवितेच्या आधारें, पण कित्येक नव्या कल्पनांसह रचिली आहे.

कपटिं हिसकुनि परि दयाशून्य काळें ।
जन्मलें नच जन्मलें, तोंच, नेलें, ॥
नयन उघडी, क्षण एक, जग पहाया; ।
मिटी, दुजे क्षणिं, नित्य झोंप घ्याया ! ॥ ४

मधुर, मोहक, मृदु, किती शोभिवंत; ।
तेज विलसे स्वर्गीय नखशिखांत; ॥
नेत्र तिजवरि खिळतो न परत येई; ।
अश्रुपूरांनीं दृष्टि मंद होई ॥ ५

वर्ण गोरा, तनुबंध सुप्रमाण; ।
खोड काढाया लवहि नसे स्थान; ॥
भाल, डोळे, हनुवटी, नाक, कान, ।
सर्व सुंदर, परिपूर्ण; नसे न्यून ॥ ६

ओष्ठिं लाली, स्मितभास मुखीं, गालीं ।
गुलाबाशीं कुमुदिनीश्री मिळाली; ॥
जरी गेली, राहील तरि अशीच ।
मना वेडया वाटतें—ही हर्षीच ॥ ७

कशासाठीं ही कुणीं निर्मियेली ? ।
मृत्युमुखिं कां जन्मतां अर्पियेली ? ॥
प्रभुवराच्या कोणच्या निरोपाला ।
सांगण्याला अवतार हिचा झाला ? ॥ ८

कोणि कोडें हें गूढ सोडवावें ? ।
उत्तरां या प्रश्नांसि कोणि द्यावें ॥ ?
मूढ घ्यावी मति करुनि कल्पनांहीं— ।
साध्य मनुजा याहुनी अधिक नाहीं ॥ ९

चिंतुनी कीं अप्रतिम चारुतेचें ।[१]
चित्र, हृदयीं, अत्युच्च कल्पनेचें, ॥
घेतली ही, श्रीयुक्त जग कराया, ।
ब्रह्मदेवानें मूर्ति करिं घडाया ? ॥ १०

पुरी झाली कृति कौशलीं अपूर्व, ।
कुडिंत उरलें घालणें फक्त जीव, ॥
तोंच सहसा कीं थकुनि विधी गेला ? ।
मती गुंगलि, निर्जीव हस्त झाला ? ॥ ११

जन्मतांक्षणिं कीं सृष्टिदेवतेला ।
हिला बघतां अनिवार मोह झाला ? ॥
वाढवाया निजदृष्टिखालिं खास ।
नेइ हरुनी हिस धरुनि मनीं हौस ? ॥ १२

बाळ किंवा आईच, हिच्या जन्मा ? ।
बळी जाइल काळास,—दैव नेमी ॥
करुनि तातावरि म्हणुनि दया काय ।
नेइ बाळातें उपेक्षुनि माय ? ॥ १३

यक्ष-किन्नर-गंधर्व-सुरसुता कीं ।
सहज खेळत ये चुकुनि मृत्युलोकीं ? ॥
असुखि भूमिस या बघुनि कष्टि झाली, ।
परत निजगृहिं अज्ञात-मार्गें गेली ? ॥ १४

जरी अमितहि दृष्टांतकल्पनांची ।
माळ मोहक गुंफिली यापरीची, ॥
फसवणुक ही लवही न फळा येई; ।
मनिंचि तळमळ पळही न शांत होई; ॥ १५

ईश्वराच्या गेहिंचा कारभार ।
मनुजधीतें जणुं पुरा अंधकार; ॥
जननमरणाचें गूढ, गहन कोडें ।
सोडवीती थोडकें, तेंहि थोडें ॥ १६

शास्त्रवेत्ते, प्रख्यात सुधी, सिद्ध ।
असति सारे वस्तुतः अप्रबुद्ध;— ॥
असें नच तरि द्या सांगु कुणी साच— ।
जन्मलें कां मरण्यास बाळ हेंच ॥ १७

जळीं मत्स्यां, पवनांत मक्षिकांना, ।
मिळे त्यांचा दिन सूक्ष्म कीटकांना; ॥
तोहि वांट्याला नाहिं हिच्या आला ! ।
चिमुकलीचा अपराध काय झाला ? ॥ १८

व्याधि-आधींनीं ग्रस्त पुरे झाले, ।
गेलि कंबर, अबलत्व पुरें आलें, ॥
जरठ याचिति तरि मरण त्यां न येई; ।
दुःख वाढे, आयू न उणें होई ! ॥ १९

मेरु झाला शतवर्षदुष्कृतींचा ।
चुरा झाला सद्बुद्धि-विवेकाचा; ॥
करिति पापांनीं त्रस्त धरित्रीला; ।
चिरंजीवितता येइ त्या खलांला ॥ २०

रुचिर, सुंदर मानवी कळ्या, छान ।
जाति खुडल्या, तोडल्या, वयीं सान ! ॥
विषम गोष्टी प्रभुरा ज्य अशा होती; ।
गूढ त्यांतिल त्यालाच कळो नीती ? ॥ २१

परी, क्षण या आवरूं विचारांसी; ।
अन्य काळीं करुं भांडण प्रभूसीः—
गृहीं आलें हें बाळ आपुलीया, ।
सोपचारें करुं गौरवा तदीया ॥ २२

आण कपडे सारेहि दाइ ! हीचे, ।
असति हौसेनें आणिले कधींचे; ॥
घाल काजळ, मुख पूस, लाव तीट ।
कुरळ जावळ शिरिंचेंहि करीं नीट ॥ २३

आण कुंची किनखाबि गोंडियांची, ।
शाल घे वर जरतारि रेशमाची; ॥
थाटमाटाचा करुनि साज सारा, ।
सर्व गृहिं तिज घेऊन करी फेरा ॥ २४

पाळण्यांतहि तिज ठेवुं जरा वेळ, ।
सर्व असुं दे तिजजवळ तिचा खेळ, ॥
रुप्याचा तो खुळखुळा, शिटी छान; ।
करमणुकिच्या साधनीं नको वाण ॥ २५

विकल, आकुल, असमर्थ रडायाला ।
तिची माताही भेटवी तियेला; ॥
साश्रु चुंबन घेउं द्या शेवटींचें. ।
अमृत होइल तें एक तत्स्मृतींचें ॥ २६

काढुनी घ्या तसबीर एक छान; ।
घेउं जरतारी काम वर करून; ॥
सहज दृष्टिस ये उच्च अशा स्थानीं ।
तिला ठेवूं सजवूनि बहुपरींनीं ॥ २७

करिति थोरांचीं स्मारकें जगांत ।
लोक बहुपरि धन वेंचुनी प्रभूत; ॥
स्मृती बाळाची याहि चिर कराया ।
यत्न करितां स्थळ काय दोष द्याया ? ॥ २८

असो; दोन्हीही जोडुनी करांतें, ।
साश्रु, सादर, नमवूनियां शिरातें. ॥
उभें राहुनियां; सुरस करुण गीतें ।
देउं बाळा या अतां निरोपातें ॥ २९

आदि–देवी जी शांति-धृति-गुणांची, ।
महाराज्ञी सुप्रेमसदयतेची, ॥
धरामाता–तिज जवळि देउं बाळ; ।
खचित घेइल ती पोटिं त्या दयाळ ॥ ३०

अप्रसन्न प्रभु तरी स्मरूं त्यासी; ।
अर्ज सादर करूं एक तत्पदांसीः— ॥
खचित बाळें या जन्मिं तरी कांहीं ।
प्रभो ! केला अपराध लवहि नाहीं ॥ ३१

पूर्वजन्मोद्भत सर्व पुसुनि गेलें; ।
विमल सुंदर, नवपुण्य रुजू झालें; ॥
म्हणुनि आत्मोन्नतिभूत वर पदातें ।
येइ बाळा अधिकार जावयातें ॥ ३२

पुनर्जन्मच जरि नियत या असेल, ।
प्रभो ! होउनियां तरी कृपाशील, ॥
परत ठेवा अमुचाच अम्हां द्यावा; ।
नीतिपथ हा तुम्हां न काय ठावा ? ॥ ३३

पाठबळ जरि अधिकारधनपदाचें ।
नाहिं आम्हां तरि करुनि कुतुक हीचें ॥
अशी संवर्धूं तिजसि, कीं गुणानें ।
शिरच नमवावें तिला त्रिलोकानें ॥ ३४

आग्रहाची परि मागणी दुजीच; ।
प्रभो ! विनती मानिली पाहिजेचः— ॥
धन्य जें कुळ जन्मूनि करिल तेथें ।
धरोद्धारी द्या चिरायुष्य हीतें ! ॥ ३५

———

## ५९ विधवा मातेचें शेवटचें गाऱ्हाणें

( कविः—श्री. नाथ निफाडकर )

" कशी मी सोडुं गे, बाले ! तुला या भोंवऱ्या डोहीं ?
कसा हा लाल जीवाचा जळीं या सोडुनी देऊं ?
मला तूं बालवैधव्यीं तनूचा कोंवळा गाभा !
मसी ना डाउका होता कसा तो तान्हुल्या ! पान्हा ! !—
कशाच्या शुभ्र या धारा उडाया लागल्या, बाले !—
अगाई ! पाय तूं ही कां हसोनी हालवीसी हे ?—
रडें कां, बालिके ! आलें ?— तुला मी एकदा घेतें—
नको पण् ! एकदा घेतां तुलाही पाप–पापी मी !
अगाई ! पाप हें माझें पहा मीं आणिलें डोहीं !—
नको गे जीव घेणें हें— नको गे राहणें येथें ! —
प्रियाळे कोमले बाले ! धरीं गे घट्ट मातेसी;
नको ही पुण्यवन्तांची नरांची संगती आम्हां—"

* * *

सखेदा हांसली गोदा तयांना घेउनी पोटीं !
नरांसीं शाप त्या देती तिघीही भोंवऱ्यामाजीं !

---

## ६० मजूर

( कवि:—श्री. ग. ल. ठोकळ. )

तांबडेंहि फुटलें नव्हतें–जुंपलों तोंच कामाला ॥
पळ उसंत नाहिं मिळाली–माथ्यावर दिवसहि आला ॥
मातीच्या वाहुन पाट्या—मानेचा कांटा ढळला ॥
नाहीं भाकर पोटाला ।
पाणीहि नसे प्यायाला ।
व्याकूळ जीव हा झाला ।
पोटाला पडला ताण—डोळ्यांत सांचले प्राण ! ॥ १ ॥

हें जिणें असें मजुरांचें—जणुं बैल तसें राबावें ॥
लागतां भूक पोटाला—मातींत घांस गिळावे ॥
कंठाला कोरड पडतां—अश्रूंचें पाणी प्यावें ॥
सारखें उन्हातान्हांत ।
राबणें असे नशिबांत ।
मग झाल्यावरती रात ।
मातींत अंग टाकावें—गारठ्यामधीं झोपावें ॥ २ ॥

कुचराई कांहीं नसतां–बोलणीं तडातड मिळती ॥
पेकटांत बसती लाथा–चाबूक फडाफड उडती ॥
लागून उन्हाच्या झळया–रक्ताचे ओघळ सुकती ॥

पोटाचि वीतभर खांच ।
भरण्या अर्धीमुर्धीच ।
हा गुलामगिरिचा जांच ।
लागतो कसा भोगावा-सोडीव यांतुनी देवा ! ॥ ३ ॥

झोपडी पडाया झाली-मोडकी शेरवाशाची ॥
छेः भांडींकुंडीं कुठलीं-उतरंड आंत मडक्यांची ।
कोपऱ्यांत लांकुडफांटा-ती चूल तीन दगडांची ॥
मालकीण माझी गोड ।
तळहातावरला फोड ।
प्रेमाला नव्हती जोड ।
पण हाय कोपला देव-आडवें पडे दुर्दैव ! ॥ ४ ॥

संसार असा गरिबीचा-चालवितां शिणुनी गेली ॥
सारखी राबराबून-ती अंथुरणाला खिळली ॥
त्यांत पिते अंगावरती-लाडकी बाळ सोनुकली ॥
आणुनियां औषधपाणी ।
वांचेल जिवाची राणी; ।
पण ढीग डोंगरावाणी ।
उचलून टाकले पार-तर मिळती दिडक्या चार ! ॥ ५ ॥

एक पसाभरही दाणे-गाडग्यांत शिलक नाहीं ॥
अब्रू झांकाया पुरतें-अंगावर चिरगुट नाहीं ।
तान्हुली भुके जे, तिजला-वाटीभर दूधहि नाहीं ॥

**चालवूं कसा संसार ? ।**
**रातंदिस चिंता फार ।**
**जाहलों अती बेजार ।**
**हा जीव कसा कंठावा ?-सोडीव यांतुनी दवा ! ॥ ६ ॥**

---

## ६१ स्नेहलतेची बहीण

( कवि:--रा. ब. दा. ग. पाध्ये )

[ आर्य-स्त्रीच्या आधुनिक अवहेलनेचें, स्वत:स जाळून घेणाऱ्या स्नेहलतेनंतर, दुसरें एक उदाहरण वंगदेशांतच घडून आलें. एका कोंवळ्या बालेवर तिला भय वाटणाऱ्या थोर पतिराजांनीं आपले वैवाहिक हक्क बलात्कारानें बजाविण्याचा प्रयत्न केला. त्याचे पर्यवसानीं सदर बालेच्या हातून घर जळालें. तिनें मुद्दाम आग लाविली या आरोपावर तिची कोर्टांत चौकशी होऊन ज्यूरीनें " अपराधी " म्हणून निकाल दिला. परंतु युरोपियन न्यायाधिशानें शिक्षा देण्याचें नाकारून गुन्हेगार ठरलेल्या बालेविषयीं दुसरी कांहीं व्यवस्था करण्याबद्दल सरकारकडे रिपोर्ट केला. पुढें काय झालें त्याची बातमी लेखकाच्या वाचण्यांत आली नाहीं. खालील कवितेंत ह्या स्नेहलता नं. २ नें कोर्टापुढें सादर करावा असा जबाब ग्रथित केला आहे. **दा. ग. पाध्ये.** ]

**मंदाक्रांता**

**' अद्यापीही छळ न सरला काय माझ्या जिवाचा ? ।**
**हा दुःखाचा कळसच असे सोहळा चौकशीचा; ॥**
**न्यायाधीशा ! करुनि करुणा, जाउं देतां न काळ, ।**
**दुर्भाग्येचा त्वरितच करा शेवटींचा निकाल ॥** १

कां प्रश्नांतें विविध करतां? साक्षि घेतां वृथाच! ।
लेखी, तोंडी जुळवित असा कां पुरावा उगाच? ॥
दोषी, पापी मजसि म्हणती सर्व तें सत्य माना; ।
नाहीं ऐसें मज न वदणें, दूषणें नाहिं कोणा ॥ २

दीनार्ता ही, जगिं न उरला वालि या दुर्बलेला; ।
माहेराला परकि, रिपुशी जाहलें सासराला, ॥
मेल्याहूनी मृतच, मजसी दंडण्यालाच सारा, ।
न्यायाधीशा! वितत इतुका मांडिला हा पसारा? ॥ ३

प्रश्नां मातें विविध करिती दोषनिर्दोषतेचे; ।
दाव्याचेही कथिति मजसी पेंच नाना तऱ्हेचे! ॥
मातें त्यांचा उमज न पडे; मी न जाणें वकिली; ।
आतां शिक्षेविण न दुसऱ्या वस्तुची मी भुकेली ॥ ४

चांडाळीणी मजसि म्हटलें, मारिलें, ताडियेलें; ।
अन्नापाण्याविण झिजविलें, अंगिंही डागियेलें;— ॥
केलें सारें सहन; परि मी आज गेलें शिणून; ।
या न्यायाच्या गृहिंच पुरता जीव गेला विटून ॥ ५

पापी, दोषी अवगुणवती मी कितीही असेन, ।
खोटें, नाटें, परि नच मुखीं मी कधींही वदेन; ॥
झाली माझ्या करिं कृति गृहीं आग जी लावण्याची ।
नाकारावी मजसि न कधीं बुद्धि ही व्हावयाची ॥ ६

अज्ञा, मूढा; अकुशल, वयें मी जरीही लहान, ।
आर्य-स्त्री मी, मजसि कळतो पत्निचा धर्म पूर्ण. ॥
भूलोकींचा पतिच म्हणती देव त्यातेंच भ्यालें ! ।
निर्भर्त्सूनी, पळुनिहि दुरी त्याजपासून गेलें ! ॥ ७

ज्वाळा नेत्रीं, विकट मुख तें, तो मिशांचा पसारा ! ।
बाई बाई ! बघुं न शकलें त्या नृसिंहावतारा ! ॥
लोखंडाचा गजच गमला हस्त य जो गळ्याला; ।
गेली शुद्धी, मतिहि थिजली, नेत्रि अंधार आला ॥ ८

झिट्कारूनी कर, मग झणीं घेतली धांव वेगें; ।
स्वैपाकाचें घर मिळविलें, पाहिलें नाहिं मागें: ॥
दाराचीही मग दृढ कडी घेतली लाउनीच, ।
छातीमध्यें धड, धड, परी सारखी चाललीच ॥ ९

तों सारेही उठुनि घरचे बोलतां, दार फोडा, ।
"घ्या ओढूनी," म्हणति, "पुरि हा आज झोडून काढा,"
तेव्हां युक्ति सहज सुचली यातनामुक्ततेची ।
देहातें या करुनिच सती अग्नितें अर्पण्याची ॥ १०

बोलूं आतां अधिक न शकें; बोलणें हा न कांहीं; ।
दावा किंवा मजसि करणें वाद कांहींहि नाहीं; ॥
ठावें मातें पुरतिच असें द्रोहिणी मी पतीची; ।
विज्ञप्ती ही मजसि करणें न क्षमेची, कृपेची, ॥ ११

न्यायाधीशा ! म्हणुनि वदतें वंदुनी मी पदातें, ।
हा दुःखाचा सकळ इथला खेळ न्या शेवटातें, ॥

क्रूर-क्रूरा, कठिण-कठिणा शक्य देणें असेल ।
ती शिक्षा द्या त्वरित, मम हा जीव तेणें निवेल ॥ १२

बोला बोला; उगिच बसतां मौन कां हो धरूनी, ।
आर्द्रें नेत्रें बघत मजसी, खिन्न मुद्रा करूनी ? ॥
सोडा सोडा सकलहि मतिभ्रामका संशयाला, ।
ग्रंथीं शिक्षा कथिलि मज द्या; जोडितें मी करांला ॥ १३

न्यायाचे ते सतत असती झांकलेलेच नेत्र, ।
त्यातें नाहीं हृदय, म्हणती, तो द्रवा नाहिं पात्रः— ॥
मंत्री त्याचे तुम्हि, चुकुं नका सत्त्व राखावयाला ।
घोरा पापापरिसच मला घोर द्या शासनाला ॥ १४

मी दुर्भाग्या; मजहुनि परी आज ह्या आर्यभूत ।
आर्यांच्या त्या असति ललना दुःखिं दग्धा अनंत ! ॥
त्यांचेसाठीं सदय अपुले अश्रु राखूनि ठेवा ।
न्यायाधीशा ! मजसि परि तो निष्ठुर न्याय द्यावा ॥ १५

तुम्ही आंग्लीं कितिकहि जरी दावियेलें दयेतें ।
आर्यांच्या ती हृदयिं न खरी आर्द्रता दृष्टि येते; ॥
आर्य-स्त्रीचे गुण पुरुष जे नित्य गाती सगर्व ।
तद्दुःखांच्या हरणिं असती तेच मागें सदैव ॥ १६

स्त्री-पूजेच्या बळिं गृहिं पुरा देवता रक्त झाल्या ।
आर्यावर्ता त्यजुनि सगळ्या आज त्या दूर गेल्या. ॥
कोणी धांवा करिल जरि या काळिंची द्रौपदी ही ।
वाटे, कृष्ण त्वरित कुणिही धांव घेणार नाहीं ॥ १७

---

## ६२ दरिद्र्याची दिवाळी

[ कविः—श्री. वि. ना. वाड. ]

आणुं कुठुनि मी तेल ? दिवाळी आली जरि आज ती ।
रिकामा खिसा सदा सोबती, ॥

दीपांची ती शोभा पाहुनि प्रसन्नता लाभते ।
जिणें मम भारभूत होय तें, ॥

तिळ तिळ तुटतें अंतर, गेहीं त्रस्त मुलें पाहुनी ।
—यातना दुःसह नरकाहुनी ॥

श्रीमंतांचीं मुलें उडविती फटाकडे फुलनळे ।
चित्त हें जळतें चितानळें, ॥

सुगंधि तेलें, उटणीं, साबण, सधनांच्या या चिजा ।
अम्हां कां देव देतसे सजा ? ॥

लाडु, करंज्या, चकल्या तैशीं, कडबोळीं जन करी ।
मिळेना पुरति अम्हां भाकरी, ॥

हेवा न करी कधीं दुजांचा तरी ताप होतसे ।
विचारें भ्रांत चित्त मी बसें, ॥

धनवानां जगिं मान, आमुची मान सदा खालती ।
कांचनें क्रिया कशा चालती ! ॥

पूर्वजन्मिचें कुठलें पाप प्रभाव दावी मला ? ।
प्रभो ! हा न्याय तुझा कोठला ? ॥

राग तसा अनुराग, लोभ, सुख दुःखादिक भावना ।
एक कां नसती साऱ्या जनां ? ॥

कसेंहि देशिल समाधान, जरि, मज देवा ! तरि पुरें ।
तीच मम दिवाळि होइल बरें. ॥

---

## ६३ अस्पृश्याची कालवाकालव

( कवि:—श्री. नाथ निफाडकर )

( एका निर्धन व गलितेंद्रिय वृद्ध मांगाचा मरणसमयींचा विलाप )

" कशा या सोसुं देहाच्या मनाच्या यातना साऱ्या— ।
मुकुंदा ! भाग्य ना माझें तुझ्याही यावया पायां ! ॥

नसे आकार त्वद्रूपा नसे विप्रासही ठावें; ।
कुणासी सांगुं पस्तावा जरी ना देउळीं जावें ? ॥

सडेलें श्वान मोठ्याचें तयाची शुश्रुषा मोठी; ।
मला देवा, तुझ्याशींही कराया वाव ना गोष्टी ! ॥

विधर्मी धर्मपाखंडी तुलाही खंडिती शस्त्रें; ।
मला पायीं मरायाही तुझ्या त्या वाव ना कोठें !– ॥

मला ना पुस्तकी विद्या, कुणी ना जागवीलेंही; ।
परंतू भाव हा माझा दयाळा, तूंच कीं पाहीं ! ॥

मराया टेकला देवा भिकारी, दास हा मांग; ।
कुठें मी शोधुं गोविंदा ! तुला आतां तरी सांग !" ॥

*　　*　　*

रडें अस्पृश्य-बंधूचें रडाया लावि तें मातें; ।
तयासी भेट दे आतां मनोज्ञे रुक्मिणी माते ! ॥

---

## ६४ अस्पृश्यांची जनता-देवीला विनंति

( कवि:—श्री. पुरुषोत्तम )

उघडिं मंदिरा । आई येउं दे घरा ॥ ध्रु० ॥

लेकुरें तव अज्ञानी ।
दुरि लोटिशि पायांनीं ।
केविं म्हणूं तुज जननी । हृदयिं निष्ठुरा ॥ १

पुत्र इतर तव जननी ।
हिंदुधर्म-अभिमानी ।
आम्हि नसूं कमि मानी । दूर कां सरा ? ॥ २

स्पर्शाहि न जवळ करी ।
राहुं न दे वाऱ्यावरि; ।
कवण माय गोजारी । दीन वासरां ? ॥ ३

शिक्षण दे अमल होउं ।
मृत मांसा मुळिं न सेवुं ।
बांधवार्थि तनु लावूं । देइं आसरा ॥ ४

उत्सुक तव दर्शनास ।
दर्शन दे पुरवि आस ।
पुण्यसंग सुसहवास । घडवि पामरा ॥ ५

कारुण्याचे गंगे ! ।
पावन करिं तव संगें ।
पोटिं घेइं निज अंगें । बाल-निर्झरा ॥ ६

अस्पृश्यां कोण वाली ।
परधर्मी प्रतिपाळी ।
स्वकीय मात्र त्यां टाळी । सोडुं कां घरा ? ॥ ७

प्रेमभूक आकुळ करि ।
तृष्णा ज्ञानाचि खरी ।
तहानभूक कोण हरी ! । जीव घाबरा ॥ ८

उसळे हृदिं दुःखसिंधु ।
येति नयनिं अश्रुबिंदु ।
दयार्द्र अहो स्पृश्य बंधु । येउं कां घरा ? ॥
आई येउं दे घरा ॥ ९



## ६८ " अश्रु-सिंचन "

( कविः—दत्ताग्रज. )

गझलः—( चालः–भासे मनांत राया )

मृत प्रभाकराची* । न पुन्हां दिसावयाची ॥ ध्रु० ॥

मूर्ती पुन्हां जगीं या । न कधीं मिळावयाची ॥
झाला प्रभाकरास्त । नुरली प्रभा जगांत ॥
अंधार घोर माजे । नेत्रांस अंधता ये ॥
संध्या उषा निमाल्या । काळोख मत्त झाला ॥
हरपे हिरा जिवाचा । आनंदसागराचा ॥
कां बागिचा फुलोरा । वाऱ्यावरी विराला ॥
कां तेजवंत नभिंचा । तारा तुटोनि पडला ॥
मधु बासरींतला वा । मधुनाद लुप्त झाला ॥
आनंद मावळोनी । सहजीं निराश व्हावें ॥
अश्रूंस ढाळुनीयां । हृदयास शांतवावें ॥

*　　　　*　　　　*

सरला ऋणानुबंध । कुठल्या फिरून गांठी ॥
राहोनि राहुनी हें । हृदयास शल्य जाचे ॥
बाबा, तुह्माविना हो । मज विश्व शून्य भासे ॥
दाही दिशा उजाड; । दीनास सर्व शून्य ! ॥
संसार विश्व ज्याचा । त्या दुःख ठाउकें ना ॥
परि दीन लेंकरूं मी । पाहूं कुणाकडे हो ! ॥

---

* कै. वा. ती. डॉ. प्रभाकर शंकर सोहोनी.

ना आसरा कुणाचा । नाहीं कुठें निवारा ॥
घेऊनि घांस तोंडीं । पक्षीण ये फिरोनी ॥
निजबाळदृष्टिसौख्या । रानींवनीं श्रमोनी ॥
चिव् चिव् करोनि इवल्या । निज चोंचिनें भरारा- ॥
कवळांस भक्षितातीं । थै थै करोनि नाचा ॥
मागें असच होतां । तुम्हि येत कीं दमोनी ॥
वाहोनि भार डोईं । अमुच्याच काळजीचा ॥
द्याया सुखा अह्मांतें । निज काय कष्टवावी ॥
पाऊल टांकताचि । दारीं, तुम्ही हसूनी ॥
' या, काय भरतराजे '- । संबोधिलें वचांनीं ॥
परि हांक आज ऐशी । मारील कोण प्रेमें ? ॥
राहूनि राहुनी कां । स्मृति ही जिवास जाचे ॥
ऐसाच नाद येतां । कोठूनसा चुकोनी ॥
छे--नाद कोठचा ?--मीं । फसुनीच कल्पनांनीं ॥
पाऊल टाकिलें मीं । आनंदुनीं मनांत ॥
त्वन्मूर्ति हाय ! दारीं । येई न दृक्पथांत ॥
जिव घाबरोनि जाई । हृत्सिंधु हेलकावे ॥
होतां पुरी निराशा । कोठें तुम्हां पहावें ? ॥
येवोनि अश्रु नेत्रीं । दृष्टीस अंधता ये ॥
नाहीं कुणी म्हणोनी । उर येतसे भरोनी ॥
सरला सुखादिकांचा । आतां पुढें पसारा ॥
विश्वांत या सुनाट । जंजाळ मात्र सारा ॥

जो तो असे स्वतःचा । ठाऊक सर्व मातें ॥
जन सर्व साउलीचे । घेईल कोण हातें ॥
नसतां कुठें निवारा । तो कोण होय ताप ! ॥
ती शांतधीरयुक्ता । गांभीर्य तेजशाली ॥
मुद्रा पहावयातें । नाहीं मिळावयाची ॥
श्रवणीं न यावयाची । मधुरा फिरूनि वाणी ॥
मारील कोण हांक । "राजे" मला म्हणोनी ? ॥
नाहीं पुढें इथोनी । मज कोणि हात द्याया ॥
राहोनि राहुनीया । हें दुःख आंत दाटे ! ॥



# भाग ७ वा

## सृष्टि व सृष्टिसौंदर्य

### ६६ कुमारी निर्व्याजा अथवा सृष्टिदेवीचें शिक्षण.*

[ कविः—रा. ब दा. ग. पाध्ये. ]

जणों नभांतिल चटक चांदणी ! केतक-वर्णाची, ।
नेत्रिं हिरकणी, मुखांत चमके माळच मोत्यांची ॥ ध्रु० ॥

*  *  *

सुरेख सुंदर, मधुर मनोहर, बांधा निर्वांग, ।
नाहिं दूषणा ठिकाण कोठें, रेखिव अंगांग; ॥
सुभगाची कोणत्या बालिका ? स्मितमय मुख हीचें ॥
गोड बोबडे बोल पुरविती कौतुक चित्ताचें; ॥
पाहि तयावरि टाकि मोहनी; वाटे उचलोनी ।
घ्यावि कडेवर, खेळवावया, बोलुनि, चुंबूनी; ॥
छान छबुकडी अशी निरखली चारच वर्षांची ।
सृष्टिदेविनें; "पुरली" बोले, "हौस बहू दिनिंची" ॥
जणों नभांतिल............ ......॥ ध्रु० ॥ १

---

* ही कविता आंग्लकवि वर्ड्स्वर्थ याच्या "Education of Nature" ा कवितेच्या धर्तीवर रचली असून हींत तिच्यांतील कांहीं कल्पना घेतल्या आहेत.

" खासच माझी करीन; देइन शिक्षण माझेंच; ।
ध्येय कल्पुनी " वदे " फळाला आणिन अत्युच्च; ॥
समाजगत निर्बंध-सहस्रीं जीव दडपलेला, ।
सहज गुणांचा स्त्रीच्या जेथें ऱ्हास बळें केला, ॥
' शोभे कां हें मुलिच्या जातिस ?'—'कशास हें स्त्रीला ?' ।
-अशी टोंचणी मातिमोल करि साऱ्या जन्माला, ॥
' घरची राणी ' म्हणूनि पदवी देती दासीची, ।
—अशा जगीं हिस एक क्षणही ठेविन नच साची, ॥
जणों नभांतिल............ ॥ ध्रु० ॥ २

"कृत्रिमतेचा गंध नसे, नच कपटाची छाया, ।
जिथें बळाचा अनय करीना मृदु हृदया जाया, ॥
पवित्र निर्मळ, सहज सुंदरा स्थळिं तिज नेऊन, ।
मनाजोगतें आणिन तीचें तन मन घडवून; ॥
हसतां, उठतां, रमतां, प्रातः संध्येच्यावेळीं, ।
पाठ तियेची राखिन दुरितें वारिन मी सगळीं ॥
स्वतांच दात्री, धात्री होइन, धर्मशास्त्र मीची ।
विमल वाहविन सरिता तीच्या अंतर्वृत्तीची" ॥
जणों नभांतिल.................॥ ध्रु० ॥ ३

" बिजलि चपलता शिकविल तिजला, तारा विलसितता
सतेजता रवि, शशी सुखदता, प्रभात मंगलता; ॥

धीरोदारा गभीरतेचे, प्रेमळ वृष्टीचे; ।
सजल पयोधर देतिल तिजला धडे, अंबरीचे; ॥
फलभारांनीं तिच्याचसाठीं तरुवर नमतील, ।
अनंतापदा शिर न वांकतां गिरिवर सहतील; ॥
बाह्यालंकृतिविणें वेणिफणि करुनी नटण्याची ।
मयूर शुकपिक कला शिकवितिल अमोघ मोलाची ॥ ”
जणों नभांतिल............... ॥ ध्रु० ॥ ४

“ झुळझुळ वाहति झरे, वेतसीं गात जिथें पवन, ।
खडकावरती, दरींत केव्हां राईंतच गहन, ॥
केव्हां सुंदर सरस्तटाकीं; लतामंडपांत, ।
बसेल माझ्या साम्राज्याचीं गुह्यें चिंतीत; ॥
मत्प्राणाशीं प्राण मिळुनि ती करील एकांत, ।
तेणें होइल कलाकुशलताविद्यानिष्णात; ॥
कण्वाश्रमिच्या शकुंतलेसहि सरी नसे जीची, ।
अव्यंगा, अव्याज मधुरता साधिन मी तीची ॥ ”
जणों नभांतिल......... ॥ ध्रु० ॥ ५

सृष्टिदेविनें यापरि केला पण, घेउनि आण, ।
पुरा पाडिला, डाव जिंकिला–काय तिला कठिण ? ॥
यापरि कुंवरी निर्व्याजा ती, खाण मधुरतेची; ।
परिणत झाली; अपूर्वगुणिनी, मूर्ति सुरसतेची; ॥

मायलेकिची सुंदर जोडी दुसरी या परिस ।
निर्माया प्रत्यक्ष विधीसहि शक्ति नसे खास ॥
असे स्वयंवर, जन हो ऐका ! एक शर्त तीची, ।
—खरा कवी जो खरा रसिक मी वरीन त्यालाची ॥
जणों नभांतिल............ ॥ ध्रु० ॥ ६

---

## ६७ खेडयांतील शांतता.

( कविः—श्री. नाथ निफाडकर )

खेडयांतिल शांतता स्मशाना-सम वदतो, सैतान तो; ।
तें पोसी जगतास, सारा जीव तिथोनिच वाहतो. ॥
नागलिचीं शेतें लवतीं; ।
पिंवळ्या ओंब्या कमानती; ।
ओहोळहि बहु हिरवळती । जीव अती आनंदतो ॥ १

रवंथांत गायी चूर ।
झाडावर झोंपे मोर ।
असा शांत जरि दो प्रहर । गोपांचा पावा घुमतो ॥ २

धरणानें बनल्या डोहीं ।
शिवमंदिर छाया पाही; ।
लाल निळ्या आभाळींही । शुक्र कहाण्या सांगतो ॥ ३

एकाद्या पडक्या बुरुजीं ।
महार मात्र गातो जी जी; ।
तुणतुण्याची तानहि ताजी तालावरि कोल्हा धरितो ॥ ४

भुतें फिरति सैरावैरा ।
थंडगार झोंबे वारा, ।
त्या वेळीं खेड्यास निखारा । शेकोटींतिल राखतो ॥ ५

तसें अरुणसमयीं गमतें ।
नगरच्याहि गाणाऱ्यातें, ।
मोटेचीं परिसुनि गीतें । नांगरवाला बंधु तो ॥ ६

आणि कुणा कविराजाला ।
सौंदर्यच बघणाऱ्याला ।
खेड्यांतिल चरखेवाला । देवच कोणी भासतो ॥ ७

---

## ६८ " निसर्ग-रमणीस-! "

[ कवि:—दत्ताग्रज. ]

[ चालः—पांडवा सम्राट... ]

बांधुनी प्रेमांत पायीं निर्झरांच्या पैंजणां ।
' छुम्छुमा ' नादा करीसी गान-देवी ! निर्मला; ॥
रत्न-माला तारकांची शोभते केशांतरीं ।
राजते भालावरी या सुंदरा इंदू-कला. ॥

'पैठणी अस्मानि ल्याली, काम्य कांती फांकते ।
शोभती नक्षत्रमाला दिव्यवस्त्रीं मौक्तिकें; ॥
खेळती संध्या उषा दो रम्यशा गालांवरी; ।
माधुरी हास्यांतली सौदामिनीरूपें खुले. ॥

* * *

नाचतांना गान गासी गोड जें वायूमिषें, ।
मद्‌हृदा आंदोलितें, कीं जागती ये स्फूर्तितें. ॥
चालना तूं शाहिरांच्या स्फूर्तिची तूतें मुदें ।
रानिचीं हीं दोन पुष्पें अर्पिलीं, दत्ताग्रजें ॥

---

## ६९ रती पश्चिमा !

( कविः—श्री. गंगाधर केशव सोनाळकर )

अस्त गिरीवर चिता भडकली ही बघ कोणाची— ।
रडुनी नयनीं लाली चढली जणों वारुणीची. ॥
कोणासाठीं ढाळित बसलिस अश्रूंची माळ ? ।
करुनि शोक कां तुझा नाथ गत येइल परतून ? ॥
खुळे पश्चिमे ! नश्वर जग हें कीं न तुला ठावें— ।
दुःखद समयीं बोल बोलुनि किती आळवावें ? ॥

खिन्नपणानें दृष्टि लावुनी मृत नाथाठायीं ।
दुःख करुनि गे अश्रु ढाळिशिल सांग किती बाई ! ॥

*        *        *

दैवें पुसला सौभाग्याचा कुंकुम तव म्हणुनी ।
काळोखाचा खिन्नपणा कां पसरे तव वदनीं ? ॥
तारांगण ते नव्हेत ज्यांनीं नभ हें आक्रमिलें ।
मंगलसूत्रांमधील मणि हे खळूकन विस्खळले. ॥
सांत्वनार्थ या आप्तइष्ट कुणि जमले भंवतालीं; ।
शोकानें बघ त्यांचीं वदनें म्लान किती झालीं ! ॥
रातकिड्यांचा सूर असे वा ध्वनि आप्तेष्टांचा ? ।
दुःखमग्न हृदयाचा टाहो जित्या जिव्हाळ्याचा ? ॥
आठवोनि सत्कृत्यें त्याचीं स्तुतिस्तोत्र गाती ? ।
गेला सोडुनि भास्कर म्हणुनी दुःखें हळहळती ? ॥
स्मशानयात्रेस्तव कीं जाती विहग, पशू, तारे ? ।
स्मृति होवोनी गत मित्राची दुःखें कण्ठ भरे ? ॥
गगनीं भरली सभा कराया ठराव दुःखाचा ।
मृत भानूच्या आप्तेष्टांच्या सहानुभूतीचा ? ॥

*        *        *

विश्व बुडालें अंधःकारीं वियोगदुःखानें; ।
निशाचरांचे निनाद गाती गीत निराशेनें ॥

वैजयन्ति अश्रूंची गुम्फिति देवदैत्य गगनीं, ।
द्वेषभाव विसरुनी असुर हे मग्न शोकगानीं ॥
दृश्य भयानक बघुनी " मृत " कवि शोकाच्या गानें ।
दुःखित विश्वा ताल देतसे गाउनि निज कवनें ! ॥

---

## ७० सदाफुली

[ कविः—रा. ब. दा. ग. पाध्ये ]

" ज्याचें एकहि रम्य पुष्प तरुणी वेणीवरी गुंफितां ।
मोहाया रसिकां समर्थ, पसरे मुद्रेवरी चारुता, ॥
गंधीं, रूपिं न त्या गुलाबतरुची मातें मनोहारिता, ।
गालांचा उपमानमान मिळवीं ऐशी न आरक्तता ॥ १

ज्याचे पुष्पि, दलीं, परागिं, कलिकानालीं प्रभा खेळते, ।
अंतर्यामिं सुधासमा सुरसता पूर्णा भरा पावते ॥
नाहीं त्या कमलापरी पद मला काव्यांमधें आदिचें, ।
श्रीलक्ष्मी मज गेह नाहिं करिती झाली हि माहेरचें ॥ २ ॥

नाहीं जाइ, जुई, चमेलिपरिची माझी तनू कोंवळी, ।
वृष्टी ही बकुळीसमान पिवळी माझी नसे भूतळीं, ॥

नाहीं मोगरिची मला धवलता जी मौक्तिकां लाजवी, ।
वेणी वा गजऱ्यांत गुंफुनि मला माळी न दे थोरवी ॥ ३

चाफा, मालति, मोतिया, गुलछबू पुष्पांसि या सुंदर ।
ये रात्रीं भर, तत्सुगंध करितो कामी जनां आतुर; ॥
ऐसा गंध न मत्त वा मृदु मला झाला विधी अर्पिता, ।
रंगांतील हि दीप्तता मज नसे, नाहीं तशी चित्रता ॥ ४

लोकीं दुर्मिळ पारिजातकिं तसा अंगीं न माझ्या गुण, ।
कृष्णांतःपुरिं माजवीन सवतींमाझारिं कीं भांडण, ॥
मातें आवडिनें म्हणेल अपुली ऐशी नसे देवता, ।
झाला न स्मर ही धनुष्यि शरसा मातें कधीं योजिता ॥ ५

लाधो वैभव त्यांस ! दुःख न मला; नाहीं मनीं मत्सर; ।
मी त्यांच्या स्तुतिपाठकींहि मिळण्या सानंद सें तत्पर. ॥
मानें हीन, गरीब, दीन, न परी माना मला अंतरीं; ।
वेदांती, बुध, अल्पतुष्ट गणुनी, वंदा न साधूपरी ॥ ६

प्रेमार्द्रा न सहानुभूति, न दया, मातें हवी तूमची; ।
देवानें अभिमानयोग्य गुणता मातें दिली अंगिची, ।
माझें नांव " सदाफुली, "-किति असे त्याचेमधें सार्थता ।
हें जाणाल, कळूनि येइल तरी माझी खरी योग्यता ॥ ७

सांगा पुष्प जगांत अन्य, असलां तुम्ही जरी जाणत, ।
येतो नित्य बहार मत्सम जया वृद्धिक्षयाऽबाधित; ॥
नाहीं एक ऋतू, न एक दिनही साही ऋतूंच्या मधें, ।
कीं जेव्हां स्मित मन्मुखीं न विलसे, नेत्रां न आनंद दे ॥ ८

बांधा उंच नसे, विशाल न तनू, विस्तार वा थोरला; ।
पर्णांची अति दाट वाढ न कधीं दे गुच्छरूपा मला; ॥
प्रातःकाळिं परी कधीं हि नयनां टाकाल माझ्यावरी, ।
तारा कीं गगनीं, फुलांस फुलल्या पाहाल माथ्यावरी ॥ ९

जन्में उच्च कुळीं, धनें, बलमदें उत्तानता पावती, ।
बुद्धीच्या विभवें, अपूर्व कृतिनें सत्कीर्तितें लाभती, ॥
आयुष्य-क्रमिं तत्सम प्रखरता, चंडांशुता ठेवण्या ।
सांगाया, मज जन्म नाहिंच दिला, औद्धत्य वाखाणण्या॥१०

मी वाढेन वनीं, तशी उपवनीं, वाटेल त्या भूमित; ।
नाहीं नाजुक मी. न ऊन हिम वा वारा मला बाधत; ॥
माझें पान सुकूनि जाइ विरळा, येई कळी ती फुले; ।
बागेंतील न ताटवा मजविणें, सौंदर्य ज्याचें खुले ॥ ११

माझ्या पांचच पांकळ्या ! परि कशा साऱ्याहि त्या सारख्या ।
प्रोत्फुल्ला असती प्रसन्नवदना, प्रेमानुबद्धा सख्या; ॥
गंगौघासम शुभ्र, निर्मल शुचिर्भूतत्व कोणावरी; ।
मध्यें कुंकुम, भोंवती अरुणवत् कांती दुजांचे शिरीं. ॥ १२

साधीं, सुंदर, शांत, निर्मळ फुलें, सौख्यें जणो मूर्तिमान् ।
मी नित्य प्रसवें; नसे तरुलता ऐशी दुजी भाग्यवान् ॥
ऐश्वर्याविषयीं न हांव मजला; मी मोक्ष हा मानितें ।
—कीं अंतःशुचिता प्रसन्नमुखता माझी सदा राखितें ॥ १३

संदेशास सदाफुली म्हणुनि ही सांगे जगाच्या हिता; ।
सौख्यानंदरहस्य घ्या समजुनी; बुद्धी करा जागृता; ॥
—जो सद्भाव धरी, करी प्रणय जो, संशुद्ध जो अंतरीं; ।
तो हांसे, हसवी; रमूनि रमवी; तो धन्य या भूवरी ॥ १४

सोडो तमासि, मृदुला मधुरा गुणांचा ।
ओढा वरो मन सदैव, शुचिव्रताचा; ॥
तेणें सदाफुलिपरी फुलली सदाची ।
आनंदवो जन कळी तुमच्या मुखाची ! ” ॥ १५

---

## ७१ गुणाकर्षण.

( कविः—मोरेश्वर )

जें रम्य असे, तें नको कुणा कळवाया ।
तत् स्वभाव गुण ते प्रकटतात कीं समया ! ॥ ध्रु० ॥

कधि कुणा पुष्प कां सुवास घेण्या बाही ? ।
कां रत्न विनवितें तेज पाहण्या निजही ? ॥
मधु काय देतसे मधुर चवीची ग्वाही ? ।
चुंबना म्हणे कां बाळ माझिया येई ? ॥

(चाल) कां वसंत-समयीं कोणा । कोकिळा, ।
‘ ये ’ म्हणे ‘ ऐक गा ताना । प्रेमळा ? ’ ॥
ईश कां बोलवी ध्याना । सोज्वळा ? ।
कां हांक मारितो निसर्ग कविला याया ? ॥
छे नव्हे !-रसिक तो स्फुरेच तिकडे जाया ! ।

---

## ७२ चिमणी.

( कवि:—श्री. नाथ निफाडकर )

पांखरूं तूं कुंपणावरतींहि भारी नाजुक; ।
सुप्रभातीं भास्कराच्या अंगणीं तूं साजुक ॥
ओहळाचे ते झरे लालीत भालीं रंगती; ।
त्यांत तूझ्या चिमकुल्या त्या चोंचिची शोभा अती ! ॥
चोंचिमाजीं त्या झऱ्याचा बिंदु-छे; तें गायन ! ।
गायनाचें तें जगाचें कोमल ध्वनिनर्तन ! ! ॥
वर्तुळेंही तीं जलाचीं चोंचिनें निर्मीयलीं; ।
वर्तुळांची वेस साऱ्या सृष्टिभोंतीं धांवली ! ॥
चालली चिवचीव-सोने, सामवेदी तान ही ! ।
मोडुं दे तो दिलरुबा ही, भारिली जो ही मही ! ! ॥

आर्द्रता ही पंखुल्यांची वाळुं दे गे कोमले ! ।
येउं दे छायेंत सारे जीव हे विश्वांतळे ! ! ॥

* * *

हा ! कशी ही चोंच एकाएकिं हीनें वासली ? ।
कोणत्या विश्वांत तूझी, व्याध, आई व्याइली ? ॥

---

## ७३ पाऊस बघून.

[ कवयित्रीः—कुमारी कमला कृष्ण पाध्ये ]

बघ आला ग । अवचित पाउस आला ।
दे रूप नवें सृष्टीला ॥

जलबिंदु पहा । सुंदरसे पडतात ।
मोत्यँच खरीं दिसतात ॥

क्षणि आकाश । भरुनी गेलें सगळें ।
मेघांनीं झालें काळें ॥

त्या निबिड तमीं । वीज कशी लखलखते ! ।
आल्हाद मनाला देते ॥

नभ आक्रमिते । सारें ही निमिषांत ।
तुलना न चंचलत्वांत ॥

तिज साह्याला । इंद्र-धनू हें खुललें ।
बहु रंगीं नभ शोभविलें ।

(चाल) बघ शिखरें हीं शैलाचीं ।
श्वेत वस्त्र नेसुनि साचीं ।
दिसतात किती मौजेचीं ॥

शिरिं कांहींच्या । सूर्य किरण हे पडले ।
सौंदर्य बहुत वाढविलें ॥
सौंदर्य खरें । परि हें नश्वर साचें ।
वाऱ्यानें क्षणिं जायाचें ॥

(चाल) चरणतळीं हिरवें खुललें ।
शेतही पाचुंनीं भरलें ।
गालिचे जणूं पसरीले ।

या धरणीला । हरित शालु नेसविला ।
प्रभुरायें हट्ट पुरवीला ॥

ही सारी गे । ईशाची संपत्ती ।
मनुज हा कोण या जगतीं ? ॥

---

## ७४ रजनी.

( कविः—श्री. नाथ निफाडकर )

रात्रीची मज संगती बहु गडे ! ती आवडे भामिनी ! ।
काळी ही ढवळ्या दिनाहुनि बरीः मातें अती कामिनी ! ॥
सारी सृष्टि धरी स्वरूप अगदीं रेखीव सूर्यामुळें; ।
दावी मोहक गोड रूप रजनी अस्पष्टतेच्या बळें. ॥

---

## ७५ कोकिळेस—

( कविः—पद्मविहारी )

गाइ गडे सखये ! आतां गोड तुझें गान; ।
अखिल विश्व भारिल ऐसी घेइ एक तान ! ॥ ध्रु० ॥

आम्रवृक्ष फुलले सारे मधुर मोहरानें ।
दिव्यशा सुगंधानें हीं दाटलीं अरण्यें; ॥
सृष्टि देवि हांसे गालीं फुल्ल सुममिषानें ।
विश्व वसंतानें नटलें; त्यजिशि कां न मौन ! ॥ १

बालिय भावि आयुष्याचे बांधिले मनोरे, ।
हाय ! परी कोसळले ते क्षणिंच आज सारे, ॥

अन् कठोर नैराश्याचें सुटत तीव्र वारें ।
ध्येय-शिखर मार्गहि तुमजे जाइं मी चुकून ! ॥ २

अंतरंगिं गत सौख्याची भडकली चिता ही; ।
जीविताचि लव आशाही तींत दग्ध होई; ॥
स्मृती मात्र रक्षारूपें शेवटीं उरे ही; ।
अश्रुसिंचनीं परि तीही जातसे विरून ! ॥ ३

परिस्थिती खडतर आली भयद् ' आ ' करोनी ।
मधुर भावना, आशा ही टाकिल्या गिळोनी ! ॥
मार्ग तदा कर्तव्याचा ये न मज कळोनी; ।
मग भरारि घेईल केवीं गरुड पक्षहीन ? ॥ ४

जीवन-सत्संगीताचा लाविलाच सूर, ।
तैं दुनिया विश्वासाची जाहली फितूर ! ॥
कुणिहि साथ करिना, सरला सर्वथैव धीर; ।
पसरलिं हीं रानें सारीं भोंवतीं भयाण ! ॥ ५

हास्य आणि अश्रू सारे संप्रती निमाले ! ।
जीवित हें जगतामाजीं भावशून्य झालें ! ॥
वेड्यापरि फिरणें आतां नशीबासि आलें ! ।
अमृत सेवितां त्याचेंही जाइ विष बनून ! ॥ ६

तुझ्या दिव्य संगीतानें व्याप हा हरेल, ।
तीव्र दुःख-संभाराची विस्मृती पडेल, ॥
भावना-लता जोमानें पुन्हां बहरतील, ।
फिरुनि अस्त झालेला रवि प्रकाशेल जाण ! ॥ ७

———

## ७६ हंसणाऱ्या तारकेस

( कविः—वि. ल. गोखले )

मेघाच्या बुरख्यामधून भगिनी ! विस्तीर्ण नीलाम्बरीं, ।
कां गे, कुत्सित बुद्धिनें मजकडे तूं हांससी अंतरीं ? ॥

देवानें दिधलें तुला अपुलिया शेजारचें स्थान तें, ।
वाटे कां म्हणुनी तशा महतिचा तोरा तुला; बोल तें. ॥

मायावी जगिंचा गुलाम बनलों बंदा पुरा नेणुनी; ।
लोटे जन्म कसा तरी; निशिदिनीं चिंता असे मन्मनीं. ॥

एखादे दिवशींहि अल्प सुख ना वाटे कसें तें मुळीं; ।
सांगूं गे किति ही अशी रडकथा आयुष्यकालांतली ? ॥

रम्य स्थानिं कुठें नभांत लपसी ? माझी दशा ही कुठें ? ।
सारें तूं सुख भोगिसी; झुरतसें हा मी पहा या इथें ! ॥

सौख्याची सर एक धाडिशिल कां या दीन भावाप्रत ? ।
हांसोनी उलटी नकोस दुखवूं मातें तशी सांप्रत ! ॥

थोरांनीं गरिबां वृथा हिणविणें हा न्याय कां स्वर्गिंही ? ।
थोरांच्या चरितीं दुजाच असतो सद्धेतु विश्वांतही ! ॥

---

## ७७ संजीवनी

( कवि:—पद्मविहारी )

ध्येयाची ध्रुव-तारका नच दिसे, अंधार कोंदाटला ।
आकांक्षा मनिंच्या मनींच विरल्या, आशा-रवी लोपला ! ॥
स्नेहाचा शुचि शांत दीप, भगिनी ! ओंवाळितां तूं, क्षणीं ।
वाटे लाभलिसे निराश हृदया ती दिव्य संजीवनी. ॥



## ७८ गिरी आणि दरी.

( कवीच्या "लोणावळें व खंडाळा" या काव्यांतील एक उतारा )

[ कवि:—रा. ब. दा. ग. पाध्ये ]

अत्युच्च हे शिखर भेदिति मेघराशीः ।
पातालवत् कुहर घोर पहा पदाशीं; ॥
साक्षात् विशालपण काय सरूप येथें ।
स्तंभावया मनुजधीस उभें रहातें ॥ १

ही विस्तृता किति अगाध दरी कळे न ।
जेथें जुनाटहि तरू दिसती लहान ॥
सारें दिसे हरितवर्ण; दिसे न भूमी, ।
कीं पाचुरंगि भरली सरसीच नामी ॥ २

कीं आंत मंदिरच सुंदर इंदिरेचें ।
उद्यानवेष्टन जया तरुंचें, लतांचें; ॥
स्वच्छंद तो करि विहार विलास येथें; ।
नाहीं रिघाव लव ही म्हणुनी नरांतें. ॥ ३

सोपानमार्ग अथवा परमेश्वराचा ।
पाताललोकिं वरुनी उतरावयाचा ॥
हा गालिचा हरित पुष्पविचित्र साचा ।
आहे वरी पसरिला विधिनें मजेचा ॥ ४

सूर्या ! तुझेहि कर येथ न दीपवीती, ।
सौंदर्य येथिल अलौकिक वाढवीती, ॥
माथीं पडे तरुलतासुमनीं प्रकाश, ।
ती चंद्रिकाच गमते नयनास खास ॥ ५

दुर्दैव कीं असुनि हौस बहू मनाला ।
शक्ती दरींत न असे उतरावयाला; ॥
पक्षीहि ते मृगहि कीटक तेहि धन्य, ।
ज्यांना सुगम्यच असे गृह हें सुरम्य ॥ ६

व्हा स्तब्ध, द्या श्रवणिं गायन-पंडितांचा ।
निर्व्याज सुस्वर असा रव हा खगांचा ! ॥
गातो कुणी, मधुर सोडि कुणी लकेर, ।
शोकी प्रियेसह कुणी उडवी बहार ॥ ७

कोणी विलाप असुखी, गमतें, करीतो, ।
दर्पोक्तिनें निज बला कुणि दाखवीतो, ॥
कोणी उडोनि नयनांप्रति दाविताती ।
आहे स्वरासदृश रम्य शरीरकांती ॥ ८

जैसे पक्षी तैसे मृगही असती दरींत वसतीला ।
झाडींतील झरोक्यांमधुनी दिसती तयांचिया लीला ॥ ९
रम्य स्थलांत करिती वसती हे भक्त सृष्टिचे सत्य ।
अज्ञात भूमिपतिसहि ऐसें सुख यांजला असे नित्य ॥ १०

स्वाद्वन्न मधुफलांचें, सुतरुच्छाया विलास करण्याला ।
प्याया अमृतोपम जल, मृदुपुष्पित पालवीहि शयनाला ॥ ११
नाहिं उद्याची चिंता, नाहिं उपद्व्याप कोणता गहन, ।
आमरण पाठिं लागे, मनुजायुःक्रमण जो करी कठिण ॥ १२
अधिकार न सुख देई, गृहिणी, पति, पुत्र वा प्रभूत धन ।
आणावा तोच सुखी, ज्याचे चित्तीं सदा समाधान ॥ १३
शांतिसमाधान सदा पशुपक्ष्यांच्या करी मनीं वास ।
म्हणुनिच रम्य स्थल त्यां यासम देतो प्रभू निवासास ॥ १४

———





डावीकडून उजवीकडे:— फोटोग्राफर–श्री. पु. वि. रहाळकर.

रा. रा. मा. रं. काळे ( मंजुमाधव ) रा. पु. वि. रहाळकर; रा. स. वा. निफाडकर

उजवीकडून रा. धों. त्र्यं. कोचरगांवकर B. A.; रा. ल. प्र. सोहोनी.

# भाग ८ वा.

## वत्सल

—०—

### ७०. चि. मधूस.

( कवि:—श्री. गंगाधर केशव सानाळकर )

मधु ! निज लीलेनें, मधु हास्यानें टाकलेंस मोहून ॥ ध्रु० ॥
बालवृत्ती सौख्य देई, ।
मुग्धताही मोह पाडी, ।
ही मुग्धलकेरी मधुहास्याची टाकिल जग भारून ! ॥ १
स्तब्धता जीवा न ठावी, ।
वृत्ति सहजानंद दावी, ।
तव नयनमनोहर चांचल्यानें मन जातें रंगून ! ॥ २
शुद्ध वृत्ती पाप दवडी, ।
स्नेह हृदिं पावित्र्य जोडी, ।
तव निर्मळ हृदयीं वास विभूचा हास्य देइ सुचवून ! ॥ ३
नील मेघां वीज खुलवी, ।
सुमन जैसें वृक्ष नटवी ।
तूं निज लीलेनें गृह भूषविसी सकलांना सुखवून ! ॥ ४
दुःखतापें तापलेल्या ।
संसृतीनें गांजलेल्या ।

या निराश हृदया पवित्रता तव मार्ग देत दावून ! ॥ ५
सागरींचीं दिव्य रत्नें ।
अंबरींचे सकल तारे ।
त्वत्प्रेमदीप्ति ही कान्ती त्यांची टाकी मन्दावून ! ॥ ६
ईश देवो सौख्य तुजसी, ।
सेवितों मी दुःखराशी ।
तव सौख्याकरितां तनु मी माझी टाकिन ओंवाळून ! ॥ ७
स्नेह काव्यस्फूर्ति देई, ।
विमलताही गीत गाई, ।
मम हृदयप्रीती पवित्रतेनें गेली ही मोहून ! ॥ ८

## ८० दृष्ट

( कवि:—श्री. ग. ल. ठोकळ. )

दृष्ट लागुनी सुकलें ग बाइ लेंकरूं ।
आतां काय मी करूं ? ॥ ध्रु० ॥

बाळ आज खेळत नाहीं, ।
दुडदूड धांवत नाहीं, ।
लागला ग माझा बाई-जीव वावरूं ॥ १

अंग भारि तापुन गेलें, ।
झांकलेत चिमणे डोळे; ।
चोंच वासुनी ग पडलें-दीन पांखरूं ॥ २

गोजिरा ग माझा तान्हा, ।
घास मुळीं घेइ न कान्हा, ।
दाटला कसा हा पान्हा-सांग आवरूं ? ॥ ३

तान्हुल्या तुझे हे ओंठ; ।
पारिजातकाचे देठ; ।
नाचती कपाळीं थेट-केस भुरुभुरू ॥ ४

गालबोट गालीं काळें, ।
शोभतात पायीं वाळे, ।
सोनुल्या पुन्हा तव चाळे-होउं दे सुरू ? ॥ ५

जीव गुंतला तुजपाशीं; ।
सांग, कां असा रुसलासी ? ।
पाडसा, जरा माझ्याशीं-बोल चुरुचुरू ॥ ६

दृष्ट तुझी काढायाला ।
लागत्यें अतां मी, बाळा ! ।
जीव जणूं वारा प्याला-काय तरि करूं ? ॥ ७

———

## ८१ तूं खेळ सुखानें सखया !

( कवि:—वि. ना. वाड )

प्रिय बाळा, रे ! खेळ सुखानें सखया ! ।
शैशविंच्या मंगल समया ॥
तुज पापाचा गंध कुठोनी ठावा ? ।
तूं तर मत्प्राणविसांवा ! ॥
खेळाया बहुविध खेळ, ।
हीच योग्य तुजला वेळ, ।
बागडसी सांज सकाळ, ।
तव लीला या हेलाविति मम हृदया । तूं खेळ० ॥ १

कच कृष्ण तुझे भुरभुरु ते उडताती, ।
गौर मुखा शोभित करिती, ॥
शुभ मूर्ति तुझी सुंदर गोजिरवाणी, ।
नेत्रांत हिऱ्याचें पाणी ! ॥
लागो न दृष्ट जगताची, ।
छाया न पडो असुखाची, ।
प्रार्थना, जगन्नाथाची ।
दे सार्थकता पुत्रच नरजन्मा या । तूं खेळ० ॥ २

———

## ८२ हंसऱ्या बालकास—

( कविः—पद्मविहारी )

हांस हांस हंसऱ्या जीवा ! हास्य तें अमोल, ।
गोड जादु बघुनी ज्याची हास्यही हंसेल ! ॥ ध्रु० ॥

हास्य-शशी वर्षी जेव्हां अमृतमय तुषार, ।
हृदय-सागरा ये भरती, झरे अश्रु-नीर ! ॥
दुःख-तिमिर जाई विलया, भान हरे पार; ।
मधुर हास्य, मधुरा ! तूझें विश्व हांसवील ! ॥ १

तुझ्या हास्यि कवन-स्फूर्ती खेळते सुहासें, ।
मूर्तिमंत मंगलतेची धवलता विलासे ! ॥
प्रेमलता दरवळती ह्या मधुरशा सुवासें: ।
करि पुनीत मधु हास्यानें सकल ब्रह्मगोल ! ॥ २

जोंवरी न वृत्ती झाल्या शिथिल वा मलीन, ।
तीव्र असुख-संभाराची आंच लागली न, ॥
दिसति कडे नष्टत्वाचे दुरूनी लहान, ।
स्वर्ग आण तोंवरि खालीं हंसुनिया सुरेल ! ॥ ३

---

## ८३ अमुची बेबी.

[ कवियित्री:—कुमारी मालती कृष्ण पाध्ये ]

छान छबुकली, गोड हांसरी, ही बेबी अमुची ।
प्राण तसा प्रिय घरदाराची मोदक-मुखि साची ॥ १

कुरळ केश ते भालिं खेळती, नयनीं चंचलता ।
गुलाब वदनीं, अंगिं विलसली सुमसम कोमलता ॥ २

रक्त ओष्ठ, त्यांमाजि हासतां दंतपंक्ति दिसती ।
वसंत ऋतुंतिल कुंदकळ्या कीं डोकावुनि बघती ॥ ३

कधीं धावत, कधीं नाचते, कधि डालत चाले: ।
स्वस्थ असति कां वदा कधीं तरि सरोवरीं कमलें ? ॥ ४

कौशल्याची कमाल केली विधिनें या कायीं ।
मूर्तिमंत सौंदर्य; अलंकृति येथ अनाठायीं ॥ ५

हौसेनें तरि कंठिं घातला ताइत मोत्यांचा, ।
चंद्रकोर जणुं, मिळे भोंवतीं प्रिय गण तारांचा, ॥ ६

सर्वांची प्रिय, कांणि येइ तरि प्रथम शोधि तिजला ।
'बेबी-कोठें, बेबी कोठें' शब्द निघे पहिला ॥ ७

सर्वांची लाडकी आमुची, परि तिज लाडाचा ।
"मक्या" म्हणुनि कुणि गोड गुलाबी अणिला मुंबईचा ॥ ८

" माझे बचुडे, " " छान छबुकडे " म्हणुनी मिरवीते ।
मकरंदा त्या तसें स्वताला, अम्हांहि रमवीते ॥ ९

दीर्घ-आयुषी करण्या तिजला प्रार्थितसें ईशा ।
प्रभो ! कृपाळा, दीन दयाळा, पुरवी मम आशा ॥ १०

---

## ८४ मातृविहीन बालकास.

[ कविः—श्री. स. वा. निफाडकर. ]

स्मित मधुर करिसि कासया बालका बघुनि शून्यशा गगनीं ?॥ध्रु०॥

तारका ती तर कुठें ना, ।
इंदु नयनां तो दिसेना, ।
एकाग्र चित्त करुनियां पाहसी कां नग अनिमिष नयनीं ? ॥ १

नील नभ भेदूनिया कीं ।
दिव्य दृष्टी तव विलोकी ।
अज्ञात तारकापुंज, शोधिती ज्योतिर्विद जे अजुनी ! ॥ २

शास्त्रशक्ती सर्व सरली, ।
मानवांची मति जिमाली; ।
अज्ञात तरिहि, तें तुवां जाणिलें; म्हणुनि हास्य कां वदनीं ? ॥ ३

काय, किंवा स्वर्गभुवनीं ।
दंग बाळें नृत्यगानीं ।
पोहती, कधीं क्रीडती कौतुकें स्वर्गंगेच्यामधुनी ? ॥ ४

इंद्रधनुचा अश्व करुनी ।
हिंडताती वितत गगनीं, ।
नाचरे नयन निरखिती तयां का हर्षोत्सुक होवोनी ? ॥ ५

शंखचक्रांबुजगदांनीं ।
शोभली जी पीतवसनीं, ।
ती सगुणमूर्ति सांवळी देखिली काय आज नेत्रांनीं ? ॥ ६

काय म्हणसी ? "हेंहि नाहीं, ।
ह्याहुनीही थोर कांहीं; ।
अपमान मात्र होतसे तयाचा तुलना, तुलना करुनी ?" ॥ ७

जन्म देतां जी यमानें ।
दूर केली निर्दयानें, ।
पाहिली माउली खास खास ती, म्हणुनि हांससी अजुनी.॥ ८

---

## ८५ चि० कुंदेला

( कवि: —श्री. नाथ निफाडकर )

( चाल:—मसि बोलुं नको रे गोविंदा )

घडि पाहिं तशिच बोले गे कुंदे ! लाडके ! ॥ ध्रु० ॥

मना मोहवीते भारी ।
मान-मोड तूझी न्यारी ! ।
मज मांस गडे येतें वात्सल्यें, गंडके ! ॥ १

तूझा पाय डावा तैसा ।
सांग सहज फिरतो कैसा ? ।
बघ रीत तुझी कान्ह्याची, बाले, गायके ! ॥ २

सान हात छानच, कुंदे, ।
काय धरूं पाहे मोदें ? ।
मज भाव तुझा उमजेना, माझें मन मुकें ॥ ३

तुझें तोंड गोंडस गोरें ।
नेहमींच भारी हसरें !
तुज गालबोट लावी माता, घे मुके ॥ ४

---

## ८६ हास हास बाळा !

[ कविः—श्री. स. वा. निफाडकर. ]

हास, हास बाळा ! एकदां, पुनरपि तें हास्य, ।
तव वदनावरती करूं दे अविरत त्या लास्य. ॥

ह्या तव हास्याची माधुरी नकळे जरि तुजला, ।
परी पहा माझा जीव रे वेडावुनि गेला. ॥

हंसरें तव वदन पहाया धांवुनि मी येत्यें, ।
कामधाम धंदा सर्वही विसरुनियां जात्यें. ॥

उपवन हें फुललें फुलांनीं जरि सगळें, बाळ, ।
कीं ताऱ्यांनीं तें भरोनी गेलें आभाळ, ॥

रंग तस दिसती नभीं जे संध्या-अरुणाचे, ।
वा प्रतिबिंबित हें जरी जल वायुसवें नाचे, ॥

हर्ष जसा होतो पाहुनी तुजला हसतांना, ।
सुंदर हें सारें, परी ती शक्ति नसे ह्यांना. ॥

संतत मजवरती सुधेची जरि होइल वृष्टी, ।
तरिही मन माझें लाडक्या राहिल रे कष्टी; ॥

परि तव हास्याची लागतां हृदया चाहूल, ।
भर भर हीं दुःखें टाकुनी पळती पाऊल. ॥

सुंदर जें जें ह्या जगीं, मन जेथ सदा धांवे, ।
कुरवंडुनि वाटे तुजवरी, फेंकुनि तें द्यावें. ॥

काय तुला देऊं अशा तव हास्याचें मोल ! ।
घे,-एकच पापा-; खरोखर हाही बिनमोल. ॥

———

## ८७ " ओवाळणी "

( कवि:—" फकीर " )

[ प्रिय भगिनी श्रीमती गंगुताई नागरे यांस:-- ]

वद् कुठें तारका खिळुनि भालिंचा पडला, ।
तूं सांग ! शोधण्या तयार त्रिभुवनिं त्याला ॥
वा सांग आणण्या खेंचुनि तो ध्रुव तारा ।
तव भालिं ल्यावया, अढळ पदा सुखतारा. ॥
जरि इच्छिशील ही भानु नभींचा दिव्य, ।
जो सहज भाल तव करील तेजें भव्य, ॥
मी करीन साहस वदशिल तें तुजसाठीं ।
मज साह्य वाटतें करील तो जगजेठी. ॥
पण वृथा कशाला डाग तुझ्या भालाला ? ।
तें सहज शोभतें, किती शुद्ध, जगातला. ! ॥
चाल—त्या तुझ्या शुभ्र भालाला—ल्यावया—
खेचुं कां शुभ्र ताऱ्याला—भव्यशा—
त्या तुझ्या देहसाजाला—शुद्धशा—
तूं सहज शोभसी गंगा पूर्ण पवित्र !
तर तुला ल्यावया साज कशा हे व्यर्थ ? ॥

---

## ८८ विहिणीला प्रार्थना

( मुलीच्या लग्नाच्या वेळीं एका गतधवेनें केलेली )

( कवयित्रीः—सौ. राधाबाई जहागीरदार )

निज पिता नसे बालेला । विहिणी, हो ! इज सांभाळा ॥ ध्रु० ॥

तो प्रसंग मजवरि पडला । झाली ही नावच मजला ॥
देतें मी तीहि तुम्हांला । जरि जीवहि उघडा पडला ॥
या समयिं नाथ जरि असते
मज हर्षवायु ही होतें;
या सुखास मोलच नसतें !
परि हाय ! सुखीं दुःखाला । जीव हा आज वश झाला ॥ १ ॥

मी खरेंच वदें, बाई ! । वाटलें मनीं त्या वेळीं:—
मी जिवंत राहुनि 'विधवा' । कटु वच कां जगिं सोसावें ! ॥
पण बालेस्तव कंठियले । सासरींच दिन शुचितेनें ॥
एकदा वाटलें चित्ता,
नसती जरि कन्या आतां
वरितें तरिही सुखेंचि चिता;
कीं प्यावें विष, इज द्यावें ! । जावें त्या पतिलोकाला ? ॥ २ ॥

परि नाथ स्वप्निं येवोनी । आश्वासन देती उभयां ॥
संकटीं देव ते येती । धावोनि देति सुविचारा ॥
"करि वरास अर्पण कन्या । जगिं राखी अपुल्या धर्मा ॥

कुविचारा मनिं नच आणी
कुलशील पुरें राखूनी
करि मुलीस सुगुणि शहाणी "
ही आज्ञा शिरिं मीं केली । वंदोनी पतिदेवाला ॥ ३ ॥

पोटिंचा असा हा गोळा । तुमचिया करीं हा दिधला ॥ ;
माझ्यासम त्यांचाही हा । आशांचा एक विसांवा ।
परि नका तुडवुं या जुइला । प्रेमें घ्या पदरीं इजला ।
ही दीन पित्याविण चिमणी
जरि कोमल नाजुक हरणी
व्याहो घ्या सांभाळोनी !
तरुलता तशी पतिसहिता । शोभवील सासर बाला ॥ ४ ॥

———

## ८९ माझी ताई.

( कवि:—पुरुषोत्तम )

" माझी येइल ताइ आज तिजला बाबा स्वतः घ्यावया
गेले; सांगितलें बजावुनि तयां ताईस घेऊनि या.
आई ! येइल ना ग ताइ अपुली बाबांसवें सत्वरीं ? "
थट्टमाजिहि 'नाहिं' कोणि वदतां बाला पडे घाबरी ॥ १ ॥

गोऱ्या सुंदर रम्य हांसत मुखा आरक्तता ती चढे,
एकाएकिंच कोसळे घन, तसें नेत्रीं निघालें रडें;
गंगा नी यमुना भरून दुथडां नेत्रापगा चालती
गालीं सागर तो गुलाबि खुलतो प्रेमार्द्रतेनें किती! ॥ २ ॥

माता धांवत येइ, घेइ कडिये, "बाळे कशा हें रडें ?
आतां येइल ताइ गे; तव, तुला आणील खाऊपुडे
आम्हां देशिल काय ? छे ! पण अतां राही उगी ! शाहणी
माझी बाळ सुलक्षणी, बघ अतां थांबेल मोठी गुणी" ॥ ३ ॥

घेऊनी हृदयाशिं घट्ट तिजला खाऊहि हातीं दिला,
प्रेमानें कुरवाळिलें मुख, तदा वर्षौघही थांबला.
"ताईची बघ वाट, जाइं; मधुला घेऊं अतां ना जरा ?
कासावीस रडूनि तो तुजसवें होई पहा घाबरा." ॥ ४ ॥

झाला मोद मना, निघे दुडदुडा दारासि गांठावया,
टाकी मंद हळूचि पाउल परी येई न चालावया.
"ताई येइल आणि खाउ मजला" या मंत्रघोषा करी,
"ताता, माइ, तुम्हां न देइं मुळिं मी" बोले सुधा-वैखरी ॥५॥

गाडी एक करीत नाद घणणन् घंटारवें पातली,
"ताई खासचि येतसे" वदुनियां बाला पुढें ठाकली.
गाडी गेलि निघून थेट पुढतीं, आशा निमाली पुरी !
वाटे निष्ठुर हा खरा विधि कसा बाला-निराशा करी ! ॥६॥

" गाडीनें वद्लीस, आइ ! अजि ये ताई विजेच्या, बये,
आली वीज घरीं, दिवे झळकती गाडी परी कां न ये ?
प्रश्ना ऐकुनि रम्य मातृहृदया पान्हा फुटे अंतरीं,
" प्रेमाचा, कलिजा कुठें लपवुं हा ? त्या दृष्ट लागे खरी."॥७॥

ऐसें बोलुनि तीस घे उचलुनी माताहि मंदस्मिता,
दृष्टी-दोषनिवारणार्थ पदराखालीं करी अंकिता.
प्रेमें घे मधु चुंबनें गुपित कीं मुग्धेसि कांहीं वदे ,
किंवा सांठविते सुधा अधरिंची बाला—कपोलीं मुदें. ॥ ८ ॥

ब्रह्मानंदविलीन सौख्यशिखरीं आरूढ मातासुता,
ऐसें सुंदर दृश्य मात्र नयनां लाधे क्वचित् वांच्छितां;
रम्याची रमणीयता मधुतमा पूर्णा करायास ती
पों-पों-पों-स्वरकारि बाष्परथ ये ऐकूनि बालास्तुती ॥९॥

ताई आलि घरांत मोद सकलां बाला-मनां जाहला,
प्रश्नांचा भडिमार तो तिजवरी सर्वां-मुखीं सोडिला.
कोणी मारुनियां मिठी मृदुकरें, कोणी तिला ओढिती,
बाला दर्शन-उत्सुकापरि अतां सोडी न आईस ती ॥ १० ॥

* * *

जों जों प्राप्त न होय वस्तु जगतीं औत्सुक्य वाढे मनीं, ।
होतां प्राप्ति, तदीय मात्र नुरतें स्वारस्य संपादनीं. ॥

———

## ९० " सासरी जातांना—"

( कविः—फकीर )

अश्रूंनीं भरल्या मुखीं सकरुणीं दारीं कुणी बालिका–।
' येतें हं ' वचनीं वदोनि अधिऱ्या पाहे पुन्हां मागुतां ।।
' आई ! धाड गडे ! कुणी तरि मला आणावयातें त्वरें ' ।
शब्दीं घेइ निरोप या निघुं बघे, तों पाय तेथें खिळे. ॥
' येतें हं बरं ! ' हाच मंत्र शतधां सांगोनि तो तो पुन्हां ।
चाले ती परतोनि मार्गीं वळुनी प्रेमी बघूनी जनां ॥
मातेचा तर कंठ दाटुन पुरा ये तत्क्षणीं पाहुन—।
बाला सासुरिं जातसे प्रथमतां माता–गृहा सोडुन. ।।
' राहे तेथ सदा हसूनि मिळुनी प्रेमें जनीं आपुल्या; ।
जीव–प्राण तशीच होइ सकलां, होशील तेणें सुखी; ॥
साधा वेश मृदु स्वभाव मधुवाक् भक्तीहि सत्यीं सदा,।
या मार्गें पथ चालतां सहज तूं होशील लक्ष्मी–गृहीं ! ॥

*　　　*　　　*

' आ बाई ! तर सोड पाश मृदु हा, होई उगी सत्वरें ।
हं सांगेन क्षणींच धाडुनि तुला आणावयातें बरें ! ' ॥





रा. एकनाथ यादव निफाडकर; सौ. इंदिराबाई निफाडकर
चि. कुमुद्दिनी ( कुंदा ).



फोटोग्राफर—श्री पु. वि. रहाळकर

सौ इंदिराबाई निफाडकर; चि. सुरेंद्रनाथ.

## ९१ चि० सुरेंद्रनाथास

( कविः—श्री. नाथ निफाडकर )

बाबू ! ये जगतीं ! तुझा करितसे सत्कार मी स्फूर्तिनें ! ।
ठावें कोण, कुठोनि या धरणिसी आलास तूं कासया ! ॥
अण्णा ! हें तुमचेंच देह धरणें झालें पुन्हां या कुलीं; ।
सोडूनी पितृलोक योग्य बघुनी आलां मुहूर्ता इथें, ॥
वेदांच्या तुमच्या सुभक्तिस फुलें येतांच गेलां तुम्हीं; ।
आतां ती फलधारिणी जगतिं या होईल युष्मद्‌बलें ॥
नाना सद्गुणराशिचे उभविले होते तुम्हीं स्तंभच, ।
शास्त्राभ्याससुकीर्तिमंदिर तुम्हां आतां असे बांधणें. ॥
"येतों मी, मजसाठिं कांहिंय रचि तूं देवेंद्र-सूक्तें नवीं !" ।
आज्ञा ही परिसूनि वर्षभर मीं आरंभिलें कार्य तें. ॥
देवांचीं भुवनें तुम्हीं गगनिंची स्वप्नांत दावीयलीं, ।
कीं व्हावी मम निश्चिता मति सदा युष्मत्सुजन्माविशीं ! ॥
होवो कष्ट कितीहि मी पितृऋणा फेडीत राहीनच; ।
सेवा नित्य करीं, सुरेंद्र ! अपुल्या या वेदभूमीस्तव ! ॥

१ ऋग्वेदाचें भाषांतर करीत असतां वडिलांचें निधन झालें. भाषांतर 'कर्मयोगीं'त अंशतः प्रसिद्ध झालें आहे.

## ९२ गुण न करीं बाळा !

( कवयित्री:—सौ. इंदिराबाई निफाडकर )

**गुण न करीं बाळा ! । इतुके । गुण न करीं बाळा ! ॥ ध्रु० ॥**
**लागेल न कां दृष्ट जगाची । पाहुनि तव चाळा ? ॥ १**
**रडणें ठावें नाहीं तुजसी । खेळां नच आळा ॥ २**
**खेळ खेळुनी दमुनी जासी । रंग चढे गालां ॥ ३**
**भूक कशी ना तुजसी लागे । जरि इतुका दमला ॥ ४**
**येतां मी जवळींच तुला रे । लक्ष न घ्यायाला ॥ ५**
**खेळत खेळत झोंपी जासी । तसाच लडिवाळा ! ॥ ६**
**झोंप पुरी होतांहि न रडसी । भुकेस्तवहि वेल्हाळा ! ॥ ७**
**दोनच महिन्यांमधीं किती हें । शहाणपण बाळाला ! ॥ ८**
**रूपगुणीं या भय मज वाटे । दृष्ट न लागो तुजला ॥ ९**
**इकडुनि म्हणणें "मामंजी तूं" । परि सुतची मजला ॥ १०**
**'मासा' होवो शतायुषी हा । विनति हि ईशाला ॥ ११**

---

## ९३ शिशु-गीत

( कवि:—श्री. धों. त्र्यं. कोचरगांवकर. )

[ चाल:-बोल बाई तूं बोल ग-बालकवि ]

**डोल बाई ! तूं डोल ग !-डोले अंगणीं मोगऱ्याचा वेल ग ! ।**
**खेळ बाई ! तूं खेळ ग !-माझ्या बाईला चांदण्यांचे चाळ ग ! ॥**

बोल बाई ! तूं बोल ग !-गाणें मैनांचें तुझ्यापुढें फोल ग ! ।
लाज बाई ! तूं लाज ग !-माझ्या सोनीला सोनीयाचा साज ग ! ॥
नाच बाई ! तूं नाच ग !-माझ्या बाईला भाऊराय पांच ग ! ।
हास बाई ! तूं हास ग !-म्हणि हरेल संसाराचा त्रास ग ! ॥
घांस बाई ! तूं घेई ग !-घांस नेण्यासि काऊचिऊ येई ग ! ।
नीज बाई ! तूं नीज ग !- हम्मा हंबरे झाली आतां सांज ग. ॥
करि अंगाइ गाई ग !-गातें कृष्णाचें गाणें तुज बाई ग ! ।

## ९४ ओवाळणी.

( कवि:—वि. ल. गोखले )

नाहीं एकहि दाम, नाहिं कपडा अंगावरी घ्यावया ।
ऐसा निर्धन होउनी भटकतों कोर्तीस शोधावया. ॥
बाह्यीं निर्धन भासलों तरि जगीं संपन्न आहें मनीं; ।
मोलाचें मन अर्पितों तुजप्रती; ही मानि ओवाळणी. ॥

## ९५ आईनें गायिलेली ओंवी.

( कवि:—श्री. धों. त्र्यं. कोचरगांवकर )

नेत्रींचा करुनी दिवा, करतळा माता करी पाळणा ।
प्रीतीची दृढ रज्जु लावुनि मुदें बाळास दे लोळणा ॥
अंगाई-कवनांस गाउनि तया जोजाविते सत्वरीं ।
ओव्यांची जननीमुखांतिल कशी वेदांसही ये सरी ? ॥

# भाग ९ वा

## शांति व आनंद

### ९६ प्रियामोहमीमांसा

[ कविः—रा. ब. दा ग. पाध्ये ]

रंभा वा रतिमेनकादि उपमा रूढा तिला देउनी ।
निःसत्त्वीं वचनीं तिची जनपदीं केली न वाखाणणी; ॥
बाह्यीं उज्वलदीप्तशा प्रभुवरें रूपा न तीतें दिलें; ।
लोहा चुंबक, तेंवि ओढुनि, परी, चित्तास घेते बळें ॥ १

नेत्रीं ही हरिणी, गतींत करिणी, वेणीमुळें नागिणी, ।
भ्रांती वा अकलंक चंद्रच मुखीं, झाली न ऐशी मनीं; ॥
सिंहाची नच पाहतां कटि तिची मातें स्मृती होतसे; ।
ब्रह्मानंद तदीय दर्शन, परी, चित्ता सदा देतसे ॥ २

सृष्टींतील उणें भरूनि, करण्या तीचेवरीही कडी, ।
गोडी मानुनि भूषणीं न अमिता, घे बुद्धि तीची उडी. ॥
साधी शाल महेश्वरीच लुगडें, ल्याली न लेणें जरी, ।
गर्भश्रीयुत चक्रवर्तिनि तशी हृन्नेत्र वेधी तरी ॥ ३

जाऊनी पदवीधरा न बनली ती विश्वविद्यालया; ।
कीर्तीतें वरिलें न लेखि कवनीं चातुर्य दावूनियां; ॥

नाहीं वा ललितां कलांत उपमा श्री शारदा देविची; ।
होई उन्नत संस्कृता, परि, मती पाहूनि मूर्ती तिची ॥ ४

जादू काय अशी तिच्यांत भरली हें बुद्धिला नाकळे; ।
कोडें सोडविण्या प्रयत्न करितां येती न त्यातें फळें, ॥
" मीमांसाश्रम हे वृथैव " म्हटलें " सद्भाग्य ईशें दिलें; ।
आनंदें उपभोगुं; सत्कृति करूं; त्याचीं स्मरूं पावलें." ॥५

जिज्ञासा परि शांत, दांत न अशा गेली उपायीं लया; ।
" तथ्या शोधिन आज," एक दिनिं, या केलें मनीं निश्चया, ॥
होती वेळ दुपार, वार रविचा, एकादशीचा दिन; ।
होती देवगृहीं व्रतस्थ बसली वाचीत रामायण ॥ ६

होती आश्रमिं तेंवि शांति, शुचिता गेहीं तदा नांदत; ।
कारुण्यादिक कोमलीं मृदुरसीं होतें मन प्रेरित. ॥
नित्याचा क्रम सोडिला, करिंचिया कामा दिलें टाकुन; ।
यावें आड न धर्मकृत्यि तिजला-नेमा दिलें सोडुन. ॥ ७

चित्रीं कीं लिखिता विलोकुनि तिला द्वारीं उभा राहिलों; ।
ती ध्यानैकरता; तिला निरखित ध्यानस्थ मीं जाहलों; ॥
पृष्ठामागुनि पृष्ठ हस्ति फिरतां एकेक मी पाउला ।
गेलों टाकित लुब्धवृत्ति जवळी;-लक्षीं न आलें तिला ॥ ८

मौना सेउनि, मानपूर्वक, उभा, मी बाजुला राहिलों; ।
तीच्या प्रेमलभक्तिरूपसरसीं मत्स्यापरी पोहलों;. ॥

सीताराम-विहार पंचवटिचा-अध्याय होतां पुरा ।
पोथी ठेउनि, सांवरूनि पद्रा, गेली पुढारां जरा ॥ ९

देव्हाऱ्यांत, समोर, मूर्ति रुचिरा होत्या कुलाधिष्ठिता ।
देवांच्या, सुमनें सुगंधिकुसुमीं प्रातःसमभ्यर्चिताः ॥
निर्व्याजीं हृदयीं करांस जुळुनी एकाग्रता आणुनी ।
साष्टांग प्रणिपात त्यांस करिती झाली मनोमोहिनी ॥ १०

माझीही द्रवली मती न कळतां जों जोडुनीयां कर; ।
जानू टेकुनि, ठेवितों निज शिरा भावें धरेचे वर;- ॥
तों ध्यानोत्थित नेत्र पूर्ण उघडी माझ्याकडे ती वळेः ।
कीं भाग्यें प्रणती तिच्याच चरणीं म्यां वाहिली, आहलें ॥११

घालूनी कर मत्करीं उठविती झाली मला सत्वर; ।
नेत्रीं लाउनि नेत्र आकळुनि घे सारेंहि अभ्यंतर; ॥
मत्कर्तव्यविमूढतेस चतुरा भेदावया बोलते— ।
" देवाशींहि, पती करी हितगुजा पत्नी न तें साहते " ॥१२

भक्तिप्रेमविनोदवृत्ति सगळी जागोनि जीवांतली, ।
येवोनी मृदु मंजुल स्मित मुखीं, जों शब्द हे बोलली, ॥
झाली काय चमत्कृती ? मुखिं तिचे ऐशी प्रभा फांकली, ।
तीची जीस सरी अशी न दुसरी वस्तूच सृष्टींतली ॥ १३

प्रातः सृष्टि विकासतां दशदिशा प्रोत्फुल्लता पावती, ।
दीपांचा करितात उत्सव नभीं त्या तारकांची द्युती, ॥

सूर्याच्या किरणीं हिरा झळकतो, वा वीज मेघोदरीं,- ।
तत्कालीन, न ये, प्रियामुखिंचिया श्रीची तयांही सरी ॥ १४

सद्भावें द्रवले तिचे नयन ते तेजेंच ओथंबले, ।
ती मुद्रा फुलल्या फुलांस करि जी सोत्कंठ लज्जेमुळें, ॥
तें मंजुस्मित, जें दिसेच सजलें काळ्याहि काळाचिया ।
चित्तातें उजळावया, मलिनता मूळींच छेदावया ॥ १५

ती तीची मधुरा गिरा, उतरली जाणों सुधा स्वर्गिची, ।
ती तत्सन्निधि, जेथ एकवटलीं सारीं सुखें विश्विचीं, ॥
—तीं सारीं, मज मोहिनी प्रबल जी त्यांहीं तदा घातली, ।
—वाटे ठेव अपूर्व एकच मला जन्मांतली लाभली ॥ १६

संसारक्रमणार्थ रत्न मजला जें दीधलें ईश्वरें ।
त्याचें मूल्य अतुल्य तेच दिवशीं म्यां जाणियेलें खरें; ॥
जन्मे कौतुक, भक्ति, आदर सखीरूपीं, गुणीं, नूतन; ।
झाला एकच तो महोत्सव मला जन्मीं सुखाचा दिन ॥ १७

सौंदर्यांतिल सार मोहकपणा, त्याचे झरे पावती ।
शुद्धांतःकरणीं निसर्गमधुरीं सद्भावि जन्माप्रती; ॥
ह्यांचा ओघ समाप्त ईशचरणीं भक्तीमधें होतसे, ।
स्वर्गीयोज्वल दीप्त तेज मनुजा तेणें, कळे, येतसे ॥ १८

तेजाची जलधींत माळ रचिती रात्रीं शशीचे कर, ।
ती त्याचेवरि वर्षिते द्युति नवी, तोही तियेचे वर; ॥

वायु प्रेरि जलांत ओघ, वितरी तो वायुवेगा बळ ।
मघोत्कर्ष वनांत होइ, करिती तेही वना सोज्वल ॥ १९

भक्तिप्रेमलतादि भाव सखिचे तेणेंपरी'अर्पिती ।
दैवी मोहनि तन्मुखीं, बळ नवें भावांस त्या देइ ती ॥
उत्क्रांतिक्रम चालला, जरि, गमे, ऐसाच जन्मांतरीं ।
माधुर्या सुगुणांस पूर्णतमता येईल बाह्यांतरीं ! ॥ २०

आम्हां जोड मिळेल यापरि तरी राही दुजें कोणचें ? ।
जीवाचें कृतकृत्य, सौख्य, न कळे, दुष्प्राप्य वा स्वर्गिचें ॥
जन्मोजन्मि, म्हणूनि ' गांठ आमुची ठेवीं दृढा, ईश्वरा ! ।
जोडी तोडुं नको सुनीतिसुखदा मुक्तींत ही'-दे वरा ! ॥ २१

* * *

झाली ही कविता समाप्त वरची तेव्हां सुखाचा दिन ।
होता श्रीहरतालिकाभगवतीसंपूजनाचा सण; ॥
आर्यांच्या ललना व्रतस्थ करिती, जन्मांतरीं एकची ।
व्हावा प्राप्त पुनश्च तोच पतिही यांच्या, तदा, देविची ॥२२

गेली दक्षसुता सती; हिमगिरीपोटीं पुनर्जन्मतां ।
झाली आचरिती पुनः शिवपतिप्राप्त्यर्थ घोरव्रता; ॥
सांगे शास्त्र,-सती तसेच विरही चिंतीत होते तिशीं ।
श्रीमच्छंकर, विश्वनाथ असुनी योगी, महातापसी ॥ २३

पत्नीच्याविषयीं अखंड, अतुला, जन्मांतराऽबाधिता ।
प्रेमज्योति अशी पवित्र असतां चित्तीं सदा जागृता ॥
कामोद्दीपनिं दूषिण्या तिज वृथा केला प्रमाद स्मरें:— ।
त्या दोषें, न तपांत भंग म्हणुनी, त्या जाळिलें ईश्वरें ॥ २४

आहे यापरिची कथा जरि, तरी आश्चर्य वाटे मला ! ।
शास्त्रीं हा हरतालिका सण कुलस्त्रीमात्र कां रेखिला ? ॥
मीमांसा वधुमोहिनीविषयिंची ही गाइली वाचितीं ।
जे त्यांची, मम तेंवि, पाळुं सण हा, व्हावीच ऐशी मती ॥२५

आर्यांच्या ललनांस एकपतिता वाटे जशी मोक्षसी, ।
वाढो तेंवि नरांत एक वधुच्या प्रेमीं रती मानसीं ! ॥
अन्योन्यप्रणयास जोड विभुच्या देतील सद्भक्तिची ।
त्यां लाभेल अलभ्य जोड अपुल्या, राष्ट्रीय ही भूतिची ॥२६



## भाग १० वा

# विनोदहास्येत्यादि

### ९७ बायसिकल–बहाद्दर

( कवि:—श्री. पां. गं. लिमये. )

दिपवाळीची सुट्टी झाली बाबा गेले मिरजेला ।
होती आई बाळंतिण ती खिळली अपुल्या बाजेला ॥ १

आईला अंधार कोठडी हद्दपारि बाबांसि मिळे ।
निर्भेळ–स्वातंत्र्याचा हा योगचि अस्मादिकां जुळे ॥ २

खाशि मिळाली पाहुनि संधी काढुनि सायकल बाबांची ।
काशा वाशा सहित वाट मीं धरिली उंटखान्याची[1] ॥ ३

एकामेकां साह्य करोनी प्रॅक्टिस् केली बसण्याची ।
किति आपटलों धडपडलों तरि पर्वा केलि न कार्डांची ॥४

होतां होतां झाली पुरती आम्हा सर्वांची प्रगती ।
घंटा पिटणें, हात सोडणें, धोतर खोणें, हीं येती ॥ ५

एके दिवशीं चूष करावी ऐशी बुद्धी मज झाली ।
सज्जनगडची[2] ट्रिप् मी काशा वाशा यांसह काढियली ॥६

आळिपाळिनें, एक सीटवर, पिन्वर दुसरा, पुढें तिजा ।
ऐशा थाटें तिघे निघालों वाटे सर्वां खूप मजा ॥ ७

१ सातारा हायस्कूलचें क्रीडांगण. २ साताऱ्याहून ७ मैल.

संपत आला तोंचि बोगदा फँा फँा ऐसा ध्वनि आला ।
कोणिकडुनि ती आली मोटर, न दिसे न कळे कवणाला ॥ ८

मागें बघतां तोल बिघडला चाकहि पुढचें लटपटलें ।
सावरितों पुरतें न तोंचि तें भूत पुढें अवचित आलें ॥ ९

शक्य न उजव्या बांजुस[1] वळणें, धरिला मोर्चा गणपतिचा[2] ।
चला म्हणालों रामदास वा गणपति आम्हां सम साचा ॥ १०

श्वान एक तैं लागे पाठी त्याशीं शर्यत लावियली ।
त्यावरि भोंकुनि सायकल आम्हीं वेगें पुढतीं दामटली ॥ ११

उतार वळणें दगड खाणिचे यांहीं रस्ता गमतीचा ।
गद्‌गद हाले देह तिघांचा स्पष्टहि उमटे नच वाचा ॥ १२

वळणाआडुनि आलि गवळिणी-गवऱ्यावाल्यांची टोळी ।
डचकुनि त्यांतिल एकजणीनें फोडिलि मोठी किंकाळी ॥ १३

क्षणभर झाल्या आट्यापाट्या सायकल मारी कोलांटी ।
इकडे काशा तिकडे वाशा अस्मादिक खाती हापटी ॥ १४

गवऱ्यांवरती काशा वाशा, त्यांजवरी गवऱ्या पडती ।
बघुनि तसें त्यां कोणिहि पुसता,-कोण कुणास्तव जाय सती?॥ १५

चरव्यांमधुनी दूध वाहिलें, रक्त वाहि या मुखांतुनी ।
लाखोली वाहिली शिव्यांची आम्हां सगळ्या बायांनीं ॥ १६

---

१ बोगदा संपतांच उजवीकडे सज्जनगडाचा रस्ता वळतो. २ खिंडीचा गणपति बोगद्यापलीकडे पाऊण मैल आहे.

द्रोणाकृति हो चाक गाडिचें, घेउनि खांदां तिचें मढें ।
परत चालतां म्हणति बायका, ' बाम्‌ना चल पोलिसाकडे ' ॥ १७

काशा वाशा करि पोबारा रडकुंडीला बहु आलों ।
आर्जव करितां ' चल घरला ' सें त्यांहीं म्हणतां बहु धालों ॥१८

आई त्यांना देउनि पैसे लावितसे अपुल्या वाटे ।
दांत परी मम कायम गेले दुःख तयाचें बहु वाटे ॥ १९

नमस्कार तुज सायकल देवी ! माते गणपतिचे खिडी ! ।
तुझ्याच पायीं झाली वघ ही जन्माची बोतरखिडी ॥ २०

परी जोंवरी दलाल डीसा नवी जडविती बत्तीशी ।
समज सायकली सूड उगविण्या तोंवरि पिदडिन तुज ऐशी ॥२१

---

## ९८ स्वयंवर

( कविः—श्री. नाथ निफाडकर )

सखी—तुज गडे आवडे सांग कोण गुलजार ! ।
भरजरी झग्याचा शूर वीर सरदार ? ॥

वधू— छे; जरि शूर, मद्यांत रुते बेहोष ! ।
ज्या विद्या ना त्या कसें वदूं शाबास ? ॥

सखी—मग रुचे तुला कां पंडित वेदाध्ययनी ? ।
वद कुणी पिपचूडी तूं घेशिल कां स्वमनीं ? ॥

वधू— छे; नको मला ते वावदूक अभिमानी ।
ते डाव डाव करितात बेडुकावाणी ॥
सखी—मग गडे हवा कां शेतकरी तो साधा ? ।
तुज असे मल्ल तो पसंत अथवा खंदा ? ॥
वधू— छे; कुणीं वरावें खेडवळा स्वेच्छेनें ? ।
मज रुचे न रेडा पहायास नेत्रानें ! ॥
सखी—मग बाले, तुजसी नकोच का वर कोणी ? ।
वधू— दे कवी शिकारी सखे, मला आणोनी ! ॥

---

## ९०. समाधिभंग !

( कवि:—श्री. पुरुषोत्तम विश्वनाथ रहाळकर )

जाई रंगुनि दंग मानसिं अशी कोणी युवा वाचितां ।
रम्या ती कविकालिदासरचिता शाकुंतलाची कथा ॥
प्रेमाचे उठती तरंग हृदयीं रोमांच ये अंगावरी ।
होई चित्त तदा प्रफुल्ल मनिची प्रीतीहि ती बावरी ॥
राही दृष्टिपुढें सुरम्य वन तें आनंदला अंतरीं ।
वाटे त्या निजवल्लभेसह तिथें क्रीडा प्रमोदें करी ॥
प्रेमें नर्म, विनोद, भाषण-अहा तें प्रेम उन्मादक ।
वाटे धन्यच जोडपें निजपरी तें प्रेम निर्हेतुक ! ॥

जाई तो विसरूनिया जगत हें तैसें स्वतांला सुधी ।
येई स्वानुभवा नितांतमधुरा गोडी समाधीमधीं ! ॥
वर्णाया न समाधि शक्य असली, आनंदिआनंद तो ? ।
बापाचे परि येति ऐनसमयीं कर्णावरि शब्द तो— ॥

* * *

" हुंडा तीन हजार रोख मिळतो ! नक्की तरी जाहलें. ।
जोशी मुन्सफ ते !—मुलीस मग त्या कां हो हवें पाहिलें ?" ॥

———

## १०० विधि-घटना—

( कविः—मञ्जुमाधव )

इंदूचे कर सिंचती श्रमयुता सृष्टींत संजीवनी ।
गाऊनी दमलीं सुखें चिमुकलीं तीं झोपलीं पाखरें ॥
चित्ता शांतविण्या कुणी कवि तटीं तो निर्झराच्या फिरे ।
कर्णी ये तंव मंदसुंदर असा आलाप वाऱ्यांतुनी ॥
अंगाई सुमबालका करि जणूं स्वर्गाप्सरा गान तें ।
वीणेचा रव दिव्यभावमय कीं श्री शारदेच्या झुले ॥
वेडावे कवि त्या स्वरा अनुसरे टाकी हळू पाउलें ।
तों—कोणी ललना-जिला निरखिण्या तारा नभींचा तुटे ॥
वाटे मानवता वरी सुकविता; ग्रंथास कंटाळली, ।
संगीतस्वर-मूर्ति वा प्रकटली जी सामवेदांतरीं ॥

धाता धन्य असे ! जयें कविवरें ही कल्पना गुंफिली ।
जिज्ञासा भुलुनी सभोंवति पुसे, " ही कोण हो सुंदरी ? ॥
" ही वेश्या " बिजली कडाडुनि जळे हृद्भावना कोंवळी ।
हा हा धिक् विधि ! जो सुवर्णचषका हालाहलानें भरी ! ॥

---

## १०१ चिरूट

( कवि:—श्री. पां. गं. लिमये )

येइ उन्हाळा, बिघडे पाणी, होइ कॉलरा शहरभर ।
भोजुनि खाती, पाणि उकळिती, थर थर कांपे जनान्तर ॥ १
ऐशा काळीं एक सकाळीं खाउनि कैऱ्या उदरभर ।
काशा-वाशा-किशा-विशांसह जळीं डुंबलों प्रहरभर ॥ २
भोजन झालें, निघोनि गेले बाबा कामा कुठें तरी ।
भरे कचेरी तों माडिवरी दोस्तांची आमुच्या घरीं ॥ ३
लाडिस झालें, बिझीक चाले, झब्बुहि झाला बहूपरी ।
किशा-विशानें चोरुनि पानें मजा उडविली परोपरी ॥ ४
वाशा बेटा वात्रट मोठा मधेंच धुंडी कोनाडे ।
त्रिचनापल्ली चिरूटपेटी बाबांची त्या हातिं पडे ॥ ५
" ओढुं, " म्हणाला, " एक यांतला, " इतरां ही कल्पना पटे
डाव चालतां पत्ते पिसतां सकलमुखांतुनि धूर सुटे ॥ ६

सर्वांवरती ताण करावी ऐसें सहजचि मज वाटे ।
म्हणुनि पेटवीं दोन चिरुट मी काढिं धूर नासिकापुटें ॥ ७
घेतां झुरके लागति ठसके, येई जल नयनांवाटे ।
उदरीं ढवळे, तेंवि मळमळे, घाम फुटे, मुखिं पाणि सुटे ॥ ८
उत्तम जन परि विघ्नविहत तरि ।
आरब्ध न कधिं मधिं त्यजिती ।
म्हणुनि खेंचिला जो पेटविला चिरुट एकदा या हातीं ॥ ९
खळबळ पोटीं, कलकल शीर्षीं क्षणाक्षणीं वाढत जाती ।
खेळा इकडे रंग बहु चढे, जवळि “गेम”ची ये संधी ॥ १०
“ लेका व्यंक्या, ठोक्या ” का[illegible]जी मज ओ[illegible]डती ।
असमाधि कहीं “ठोक” म्हणोनी आधिंहीं एक्या पिटिती ॥ ११
त्या “ठोकू” सरशी “ओकक” [illegible]शीं ।
मज झाली खळबळुनी वांती ।
झाली गडबड [illegible] मांडण्याही पुरती ॥ १२
[illegible]च, वमनही पाहुनि आ[illegible] म्हणति [illegible]आन्तरीं ।
समजे “ पोरा होय कॉलरा ” बाबांना झणिं पाचारी ॥ १३
ठोकुनि छाती डॉक्टर म्हणती केरा “[illegible]” हो भारी ।
“इन्ट्राव्हेनस इंजक्शन”ची करिती ज्ययत तय्यारी ॥ १४
मज निजवीती हात बांधिती डॉक्टर धरती सुई करीं ।
तव्हां कथिलें वृत्त विडीचें कोलुनि दोषा किशावरी ॥ १५
डॉक्टर थिजले, वडिल धुमसले, आइ घसरली किशावरी ।
मी मेल्याहुनि मेला झालों अद्दल घडवी चिरुट पुरी ॥ १६

---

# १०२ तुम्ही कोण ?

( कविः—श्री. नाथ निफाडकर )

तुम्ही कोण ? यती ? छे; रतिची नाहिं शिसारी. ।
तुम्ही कोण ? कवी ? छे; नच मी काव्यि जुगारी ! ॥
तुम्ही कोण ? रवी ? छे; ख-ग तो नित्य अ-नारी; ।
तुम्ही कोण ? शूर ? छे; अगदीं मी न अघोरी. ॥
तुम्ही कोण ? हरी ? छे; नच मी वारिविहारी; ।
तुम्ही कोण ? मुनी ? छे; न तया कांहिं उभारी ! ॥
तुम्ही कोण ? नाग ?-छे; चिड[illegible]ी !—मी न विखारी ।
तुम्ही कोण ? हिरा ? वा ! मी कां कांच बिलोरी ? ॥
तुम्ही कोण ? पशु ? माहित ना कोठलि खोरी; ।
तुम्ही कोण ? अहां मम्मद कां ?—मी नच चोरी ! ॥
तुम्ही कोण ? [illegible], मजसी नीट विचारी ! ।
तुम्ही शेतक[illegible] छे; [illegible] वृ[illegible] मनोरा ! ॥
अहां कोण त[illegible] ? कां छळितां ? भावडि छोरी ! ।
अगे ! मी तर हा जाण तुझा बाणशिकारी ! ॥

---

## १०३—स ?

( कविः—श्री. सोपानदेव चौधरी )

झाला बाल्यि विवाह गे तुजसवें; केव्हां स्मरेना मला ।
कैसा राहुं शकेन सावध सखे ! तीं अष्टकें ऐकतां ॥
द्यावा दोष भटास काय म्हणुनी; ब्राह्मण्य आहे कुठें ? ।
आशीर्वादच भोंवला मज पुरा " कुर्यात् सदा मंगलम् ॥ १

पत्नी कोण पती ? कशास म्हणती ? जाणीव याची नसे. ।
होतें वाटत मन्मनीं पुढति ही नांदेल जोडी कशी ? ॥
लावूनी हळदी मुदें सजविल्या, हीं बाहुला-बाहुलीं ।
रूढी खेळलि खेळ हा क्षणभरीं, झालें जगाचें हंसें ॥ २

कोठें सांग तुला भिवून दडलें सौंदर्य अन् सद्गुण ? ।
ब्रह्माला तरि काय वाण पडला, माझ्याच वेळीं अशी ! ॥
पाहूनी तुज कोणता वद मनीं संतोष मानूं तरी ।
हातीं घालुनि हात चालवुं बये ! संसार-नौका कशी ? ॥ ३

* * *

कुंकूं लावूनि जो तुवां कधि तरी सन्मान मातें दिला ।
त्याचा मोबदला तयार, बघ हीः घे सोडचिठ्ठी तुला ॥

———

## १०४ अफूबाज.

( कवि:—श्री. वि. ना. वाड )

( कवीच्या " खरी कसोटी " या नाटकांतून )

" ही अफू जगीं सुखदाई ।
उद्धार कराया येई । ही अफू० ॥

पाडिते विसर चिंतेचा ।
वर्णनीं धजेना वाचा ॥
(चाल)—व्यवहारिं नरा किति चकवी ।
कर्तव्यपालनीं चुकवी ॥
घरदार शेवटीं विकवी ।
सुख परी स्वभक्तां देई । उद्धार ॥ १ ॥

आमुचें भान हो हरि तीं ।
दाविण्या स्वर्ग भूवरतीं ॥
मुक्तीच हिनें मिळवीती ।
अशि किती कथूं नवलाई । उद्धार ॥ २ ॥

---

## १०५ पोळ्या लाटतांना पाहून—

( कवि:—द्वारकारमण )

( चाल:—लावणीची )

पोळ्या लाटा वरणहि घाटा ऐशी करिती वटवट ।
तिखट वाटतां मीठचि घाला हुकूम करितो चौकट ॥ १

पानें वाढा भांडीं ठेवा पाटहि मांडा चटपट ।
भात वाढुनी वरण घालुनी जेवा तुम्ही झटपट ॥ २

प्रयत्न अमुचा असे प्रथमची बहु होई ती लटपट ।
गोड करूनी घ्यावे घांसां सुफलच्च होवो खटपट ॥ ३

ऐते खातां व्यर्थचि फिरतां उगाच करितां कटकट ।
तोफांचे जणुं गोळे सुटती शब्दच तुमचे सटसट ॥ ४

पोळया लाटुनी तवा भेटतां अवाज होतो फटफट ।
प्रियनाथाच्या स्वागतार्थ ती घाली लावी हो ताट ॥ ५

बहू सजोनी बहू नटोनि बहू दिसे ती चोखट । *
क्षुधार्थि यांना चरणि लोळवी असे अती हो तापट ॥ ६

अगाध लीला कुलांगनांची असे बहू ती चात्रट ।
खातां खातां दमती सारे आहे अति ही वातट ॥ ७

मायेमध्यें अपुल्या गुंगवि करणी तिची अचाट ।
छाति ठोकुनी पुढें येति न दमवी त्याला दमदार ॥ ८

तिचें रूप तें रम्य दिसतां अग्नि होतसे लंपट ।
त्या साध्वीच्या स्पर्शासाठीं अनला पडतें संकट ॥ ९

उज्वलता ती तिची बघुनी अग्नि होतसे रागीट ।
आलिंगन तें देतां तिजला येई मूर्खाला झीट ॥ १०

त्या पाप्याचें दर्शन होतां येई तिजला अति वीट ।
मूर्छित होउन तदनंतर तो जाई वळणावरि नीट ॥ ११

बहू सुशीला बहू कोमला रूप-लतेची ती लाट ।
सकल जनांच्या पोषणाचि हो दावी सुगमची ती वाट ॥१२

पृथ्विरूप त्या घेउनि घांसां आपाचा [illegible] हो घोट ।
विराट रुपसें गोल गिळाया समर्थ आहे तें पोट ॥ १३

---

## १०६ अद्भुततेचा [illegible] आल्यानंतर

( कवि:— श्री. [illegible] )

प्यालों सुंद[illegible]ता [illegible] सरुचिता [illegible]कंठ आतां कवे ! ।
सेवूनी अ[illegible] असें [illegible] [illegible] [illegible], [illegible] ! ॥
मेघांच्या[illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible]ळकों: ।
झंकारें [illegible] [illegible] [illegible] [illegible] तुझ्या. ॥
झाला यौवन[illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible]ांमध्ये: !
स्फूर्तीच्या [illegible] [illegible] [illegible]लिया टाकिती. ॥
पुष्पांचे [illegible] [illegible] [illegible] [illegible] टाकिती; ।
मार्गी हो सुमनं [illegible] [illegible] केशी आतां [illegible]लतां ? ॥
आहे एकच कां [illegible] [illegible] [illegible] [illegible], नर ? ।
संध्यारंगच कां तुझ्या उपवनीं काव्यार्थ आनंदती ? ॥
नाहीं एकहि कां तुझ्याविण दुजा स्वर्का[illegible]लोकीं नर ? ।
लोकीं नारिच ये [illegible]दव, नकळे, कैशी तुझ्या नेमकी ? ॥
आतां ये जगतांत या, प्रिय कवे, नक्षत्रमालांतुनी ।
गावोनी मज तृप्ति दे सुकविता साधी सुधी मानुषी ॥

---

## १०७ स्फूर्ति-देवतेस—

( कविः—श्री. प्रभाकर बळवंत वैद्य )

स्फूर्ति-देवते येइ सत्वरी ये गरिबाच्या घरीं. ।
करिशि कां कृपा न इतुकी तरी ? ॥

नांव गाजलें ' कविवर ' माझें निस्संशय भूवरी. ।
मित्र हे मेळेवाले तरी ! ॥

बाप मुलींचे नाहीं धजले, द्याया मजला वधू ! ।
नाहिं मी जरि गे पंगू अधू ! ॥

तव आशेनें अभ्युदयावर उदक सोडिलें, गडे ! ।
बघ तरी मृदु शब्दें मजकडे ॥

इतर कवींच्या कविता वाचुन जळत हृदीं शेगडी— ।
वरि शिजे विडंबनच हरघडी ॥

तंद्रि लावण्या चिपळ्या झांजा विकत आणिल्या जुन्या. ।
जाति त्या संक्रांती तरि सुन्या ! ॥

या दसऱ्याला एक ओळही नाहीं रचिली सखी; ।
तुजविना देश-भक्ति ती मुकी ! ॥

गेले वाया दोन लग्न-दिन मंगलाष्टकांविण ! ।
तुच्छ हें जीवित काव्याविण ! ॥

गुडी-पाडवा तसाच गेला ! भाउबीज ही तशी ! ।
अरेरे ! दीन अवस्था अशी ! ॥

'विरही' कविता लिहावया मी धडपडतों हो किती ! ।
अनुभवाविण पण नाहीं गती ! ॥

अनुभवण्या परि विरह मिळावा आधिंच सांगा कसा ?।
बाप हा लग्न करीना कसा ! ॥
क्षणभर सखये तुझ्याच विरहीं विहार करुं दे मला ! ।
त्यांतही सुचेल कविता-कला ! ॥
हास्यरसान्वित काव्य करूं का ? रसिकवरे गे, अतां ! ।
छे ! नको ! नायक साक्षात् स्वतां ! ॥
शृंगाराच्या माकड-चेष्टा करवुं तुझ्या का करें ? ।
कृष्णजी-राधा अपुलें बरें ! ॥
अरे बापरे ! नको नको ती रोमँटिक कल्पना ! ।
देति कीं मज बाबा लाथ ना ! ॥
कारुण्याच्या काव्य-कृतीनें रडवूं मग कां तुला ? ।
कोणि ना अहह ! मरे आजला ! ॥
कारुण्याची उठवुन देतों कविता बघ, सुंदरी ! ।
लाभली जरि मज संधी बरी ! ॥
पत्र पहा ये ! डोळे फाडुन, गेले गे गाजसे ! ।
अण्णा एम्.एल्.सी कापसे ॥
गेले 'अण्णा' तरि तव मन्ना अजुनि कसा कायम ? ।
करी ना प्रसन्न तुज कां यम ? ॥
वाईटांतुन कधीं चांगलें निघतें तें हें असें ! ।
कवीला स्फूर्ति मिळे ह्या मिषें ! ॥

* * *

झालों उत्सुक सर्व तयारी जय्यत केली बघ ! ।
उशिर कां तुझ्याचकडुनी मग ? ॥

सुंदर अणिला गुलाबि कागद सबंध हा कुठुनसा ! ।
थरथरे फौंटन् करिं हा कसा ! ॥
अधिरपणानें हिरवी शाई फुरफुरते बघ मुखीं ! ।
तूंच कां स्फूर्तिदेवते ! मुकी ? ॥
प्रसंग असला कसला येतो ? पुरनपि गे साजणी ! ।
चल सखे ! साधूं ही पर्वणी ! ॥
तारिख लिहिली, तशो वार मिति, शक-सालहि नोंदलें ! ।
बरोबर बारा बघ वाजले ! ॥

---

## १०८ स्मृति.

( कविः—सुकांत )

आठवतो का सांग गड्या तो काल परीक्षेचा ।
अभ्यासाचा, उनाडकीचा, खेळत फिरण्याचा ॥ १

शाळेचें देऊळ चिमकुलें चिमकुलेंच जीव ।
बसलों होतों पंतोजींचे बालक भोजीव ॥ २

पहात होते तात्या तेव्हां खोड्या बाळांच्या ।
जणुं आठवती त्यांसहि त्यांच्या त्याच सुकालाच्या ॥ ३

शिकव शिकविती तात्या परि त्या लक्ष मुळिं न देतां ।
घालविले जे दिन ते गेले हां बघतां बघतां ॥ ४

अभ्यासाचे विषय अतां ते गेले विसरोनी ।
उरले सुरले ते स्मृतिवरुनी चल टाकूंया पुसुनी ॥ ५

तूं मित्रा तो मीहि तोच रे त्याच आज बाता ।
परि जे गेले दिन ते आतां येतिल का हाता ? ॥ ६
कशास आतां आशा नसती होउनि जें गेलें ।
परत न येइल जरि रडरडुनी डोळे बघ सुजले ॥ ७

---

## १०९ तारकांवर उत्प्रेक्षा.

( कविः—श्री. ना. गो. पिंगळे )

पित्यापासुनी जन्हुकन्या निघाली, ।
नगाधीशमौलीं उडी घेइ खालीं; ॥
फुटे वारिधारा, उठे बिंदुराजी ।
नभीं भासते तारकारूप आजी ॥ १

*　　*　　*

रणीं मारिलें अर्जुनें आत्मजाला, ।
पिता सूर्य शोकें जणों दग्ध झाला; ॥
महावेगिं तो सागरीं देह फेंकी ।
नभीं तारका जाहल्या तैं विलोकीं ॥ २

*　　*　　*

चाले रणांत शरतांडव पांडवांचें; ।
देवेंद्रमंदिरिंहि नृत्य सुरांगनांचें; ॥

मुक्तामणि स्खलति कांचनमेखलांचे; ।
तारा न या; विखुरले सर मौक्तिकांचे ॥ ३

*                    *                    *

पुरा दिव्य झाले तपी आर्य लोकीं ।
गमे तारका होति ते देवलोकीं ॥
चुके एक त्यांतील, त्या शोधतांना ।
नभीं ठाकती पाहुनि गांधिजींना ॥ ४

*                    *                    *

सिगारेट जे सीझराख्यात केले ।
कुणी स्वर्गि त्या ओढतां श्रेष्ठ गेले ॥
तिथें ही पहा चाललें धूम्रपान, ।
न तारा, सिगारेट-अग्रेंच जाण ॥ ५

*                    *                    *



# भाग ११ वा

## वीर

### ११० युद्धाची तयारी

( कवि:—श्री. नाथ निफाडकर )

[ कवीच्या इन्द्रसूक्तांमधून. ]

इंद्रा ! दे मज कोश सर्व तव ते युद्धांत जे जिंकिले; ।
आम्हांला अजुनी हवे भुवनिं या युद्धार्थ ते सर्वही ॥
निश्शास्त्र नच जाहलों; घुमविणें आम्हांस युद्धें नवीं; ।
येई सत्वर वीर्यशालि तरुणां घेवोनियां, हे प्रभो ! ॥
शत्रुस्थानिं असे प्रभाव इतुका, दीपोनिया आतसूं; ।
यंत्राचे तर ते धनी, सधनही संपूर्ण पृथ्वीवरी. ॥
किल्ले फोडियले तुवां, परि तयां किल्ले अनावश्यक. ।
जीवा गोठिव सर्वदा हिमच तूं वर्षूनि त्यांच्यावर ॥
आम्ही आर्य तुझेच भक्त म्हणुनी वांचीव त्या संकटीं ।
यंत्रें मोडुनि टाक या धरणिसीं वज्रें समर्थें तुझ्या ! ॥
यंत्रांची गति मानसापुढतिं ना चाले कधींही मुळीं; ।
देई मानसशक्ति ती मज विभो, आतांच आतां, त्वरें ! ॥
देतों सोमघटां ! नभांत फिरुनी विद्युल्लता नाचवीं; ।
रुद्रातें ' अवतार घे ' म्हणुनियां आज्ञापि आतां प्रभो ! ॥
सारे मारुत बोलवी, धरणिशीं घाली धुमश्चक्रि या; ।
नाथा गौतमगोत्रजा मग खरा आनंद तो होइल. ॥

---

## १११ ती तरवार ?

( कवि:—श्री. माधव बळवत वैद्य ऊर्फ मनोहर माधव )

तेजस्वी तरवार तीक्ष्ण तळपे ! सिंहासनें हाललीं ! ।
आले स्वर्ण किरीट, रत्नि जडले, पायांवरी लोळत ! ॥
मांसाच्या चिखलां हडें रचुनियां हो मन्दिरें बांधलीं ! ।
सौधांच्या वरुनी हिनें डुलविला-झेण्डा कुठें डोलत ? ॥
होण्या लग्न सुरम्य राष्ट्रपुरुष-स्वातंत्र्य-देवी-शिरीं ।
शत्रूंच्याच असख्य ओंवुनि शिरां मुंडावळी बांधिल्या ! ॥
रक्षायास तिचाच कुङकुम-टिळा रक्तांञ्जली अर्पिल्या ! ।
केला होम हिनें ! धडाडत किती संसार या भूवरी ! ॥
हाडांचे उभवून पर्वत कुठें स्वातंत्र्य-सम्पादनीं— ।
रक्ताच्या सरितेस वाहवुन तूं सम्राट संहारिले ! ॥
माता मंगल तूंच ना बसविली स्वातंत्र्य-सिंहासनीं ? ।
कोणी नाहिं जगीं सदा नमुनियां तीं वन्दिलीं पाऊलें ? ॥
विश्वाला सगळ्या जिनें हलविलें-तलवार ती कोणती ? ।
ती तल्वार कुठें ? न लाजहि उरे ! सारे जगीं हांसती ! ॥

## ११२ वीराचें मागणें.

( कविः—श्री. गंगाधर केशव सोनाळकर )

**मज नको शयनिंही झोंप सुखाची देवा !।
मज नकोच** भावो संसाराचा ठेवा. ॥

मज वीट सख्या रे, सकल जगाचा आला ।
मज एक पाहिजे खड्ग आणि तो भाला. ॥

रणशूर नराचें मला पाहिजे मरण; ।
स्फुरतात बाहु हे आठवतां शिवचरण ! ॥

ही परवशता करि वृत्तीला बेभान; ।
सत्त्वार्थ संगरीं झगडुनि द्यावे प्राण ॥

---

## ११३ मातेचा उपदेश

[ कविः—श्री. गंगाधर केशव सोनाळकर ]

जरि सुता ! पिताजी गेले तव ते स्वर्गी ।
घे शस्त्र करीं जा कुलकीर्तीच्या मार्गी ! ॥
जरि धारातीर्थी मरण लाभलें तुजसी, ।
प्रेमेंचि तरी मग येइन भेटायासी. ॥
निर्वंश जाहलें कुळ तरि राखी शाळ, ।
तरि सेवा सोडुं नका भूमिची बाळ ! ॥

तव पूर्वज वदती स्वर्गातुनि “ बा, धांव !।
जा लढतां लढतां, चढवि कीर्तिला नांव ! ” ॥

(चाल)— रणशिंग गडावर गर्जे—राजसा !।
बुरुजावर दुंदुभि वाजे—राजसा !।
उघडले स्वर्गिं दरवाजे—राजसा !।
बा धांव म्हणोनी धांव संगरीं आतां ।
तुज देशाकरितां निरोप देते माता. ॥

———

## ११४ निजलेल्या गरुडास—

( कवि:—श्री. गो. ना. लाटकर )

तोड शृंखला हे गरुडा !। दे स्फूर्ती नव जीव जडा ।
या अंधाऱ्या रात्रींत । पहा भुतें हीं फिरतात ।
घुबडांचा कटु घूत्कार । मना दुखवितो हा फार ।
सोड झोपडी । जागा होई । जात वेळ ही !।
दूर फेक या शांतीला । ब्रीद राख या समयाला ॥ १

षंढ अहिंसा नसे बरी । दुष्ट रूढि ही सोड तरी ।
शास्त्र्यांचा तो उपदेश । देउनि टाकी भतांस ।
शत्रू तुझे सारे जमले । प्राण घ्यावयाला टपले ।
फार झोपुनी । होते हानी । जाण हे मनीं !।
सोड सोड या निद्रेला । ब्रीद राख या समयाला ॥ २

विनता-माता ही फसली । दास्याच्या जेव्हां आली ।
तेव्हां तीतें वांचविलें । शौर्य-युक्तिनें सोडविलें ।
ऐसा तूं असती थोर । काळ झोंप कां घेणार ? ।
सर्प मंडळी कलित माजली । डंख लागली ।
ऊठ दाखवी शौर्याला । ब्रीद राख या समयाला ॥ २

---

## ११८ " लढाईवर जातांना "—

( कविः—फकीर )

चल सोड लाडके ! सोड जाउं दे आतां ।
तुज कसें जाणवे कोण दुःख या चित्ता ? ॥
ती ' हाय , ' धाय ' मम मातृभूमि गे ! रडतां— ।
ही वेळ न बसणें कवटाळुनि प्रिय कांता. ॥
चल सोड पाश हा कोमलतर बाहूंचा ।
" हं " पुरे जाहला खेळ गडे ! प्रेमाचा ! ॥
ती ' हाक एक ' गे ! मातृभूमिकार्याची— ।
' तलवार प्यार अन् एकच ' ह्या जीवाची. ॥

(चाल)— चल सोड प्रीतचा पाश—लाडके ।
जाउं दे रणांगणिं आज—लाडके ! ।
करण्यास माय-भू-काज-लाडके ! ।
चल सोड जाउं दे, नसे प्रेमलीलेला— ॥
हा प्राण वाहिला—' मातृभूमिसेवेला ' ।

---

# भाग १२ वा

## जग आणि जीवित

### ११६ मानवी-जीवित

( कवि:—श्री. मो. त्र्यं. कोचरगांवकर )

गौरी जेविं वसंतिं, केतकमुखी रामाऽभिरामा दिसे।
झोंपाळ्यावरती नवोढ तरुणींमाजीं प्रमोदें हसे ॥
डोहाळे म्हणुनी सखीगण तिची ओटी भरूं लागला।
तीतें मंगल मंगलप्रद दिनीं तो बाळही जाहला ॥ १

शुक्लेन्दूसरसा हळूहळु गृहीं—वाढे यदा तान्हुला।
साऱ्यांतें अतिरम्य अस्फुटनचीं आनंदवी सोनुला ॥
घेतां मातृपयोधरासि वदनीं खुद्कन् मुदें हासतो।
चुंबा गोड मिळे तदा जननितें तैसा कुणा लाधतो ? ॥ २

खेळे बाळ बघूनि गोकुळच तें वाटे गृहीं नांदतें।
सारी बालचमू ‘ अगोचरपणें ’ मातेस भंडावितें ॥
वाटे फूल फुले विहंगम नभीं स्वच्छंदसा वा उडे।
आधिव्याधिविमुक्त शैशव जगीं कोणा बरें नावडे ? ॥ ३

विद्याभ्यासमना विनीतहृदयें शालागृहा जातसे।
आचार्योदित सर्व चातक जसा हृत्संपुटीं घेतसे ॥
नानाग्रंथविलोकनें विशदधी सत्पण्डितां लाजवी।
विद्याभूषण हा बनूनि अपुल्या बाल्याप्रती संपवी ॥ ४

ओष्ठीं पुष्पशरध्वजा विलसते कृष्णांचला यौवनीं ।
संसारीं सहचारिणी गुणखनी ह्यातें हवी भामिनी ॥
तन्वंगी सुमती सुलक्षणवती कन्या कुमारा यदा ।
घाली माळ गळां गमे सदनिं ये मांगल्यलक्ष्मी तदा ॥ ५

होवोनी मधुदृष्टिमीलन वधू गात्रांमधें हासते ।
मुग्धेच्या अधरामृता पति पितां लीलावती लाजते ॥
प्रेमाच्या कलहीं विलासिनिसवें आलिंगना वांच्छितो ।
ऐसा कोण जगांत जो पुनरपी तारुण्य ना इच्छितो ? ॥ ६

सौंदर्यें कमनीय यौवन तया थोडया दिनीं सोडितें ।
कार्याकार्यविचारणें मन तदा प्रौढत्वहीं ओढितें ॥
लोकीं वैभवकीर्तितें मिळवुनी सत्कर्ममार्गी धरी ।
धर्माधर्मविचिंतनीं नर पुढें अध्यात्मचर्चा करी ॥ ७

वार्धक्यें थकते तनू ! विकलता येतेहि गात्रांप्रती ।
चित्ता विस्मृति ती पडे घडिघडी ! भ्रंशेहि त्याची मती ॥
पश्चात्तापमना अहर्निश भवक्लेशाग्निनें पोळतो ।
" देवा ! धांव अतां जगांतुनि मला सोडीव " तो प्रार्थितो ॥ ८

कंठीं घर्घर लागते कुणि मुखीं गंगोदका घालितो ।
' झालें आटपलें ' बघूनि सदनीं आक्रोश तैं दाटतो ॥
सारे शेवटचे विधी उरकुनी चौघांजणीं वाहिला ।
घालोनी सरणावरी तदुपरी मंत्राग्निही ठेविला ॥ ९

———

## ११७ मृत्यूचा धिःकार

( कविः—श्री. वि. ना. वाड )

[इन्फ्लुएंझाचे वेळीं सन १९१८ सालीं, रुग्णशय्येवर कवीनें काढलेले उद्गार]

धिःकार असो हे मृत्यो ! कुटिला ! तुजला ! ।
तव भीति मुळीं मज वाटे ना हृदयाला ॥
मी सरस्वतीचा अल्पवयी प्रिय बाळ ।
त्या करिसि काय तूं ? नीच, कुटिल, चांडाळ ! ॥
रडविलेंस कितिकां आप्तबंधु नेवोनी ।
किति अनाथ अबला नाडिल्यास या भुवनीं ! ॥
किति सान शिशूंच्यावरचें हरिलें छत्र ! ।
तव दुष्टपणाचा प्रभाव हा सर्वत्र ! ॥
परि तुला सांगतों गर्व मुळीं न करावा; ।
सद्विचार करुनी, कुटिल मार्ग सोडावा ॥
मम जर्जर होई व्याधीनें तनु भारी ।
अणि दिसे आज दृष्टीस, तुझी रे स्वारी ! ॥
वाटतें तुला कां ? मजला घेउनि जावें ? ।
त्यायोगें मूर्खा ! किती ठेवितिल नांवें ? ॥
लोकांचें राहो ! नेशिल जरि तूं मजला ।
चैतन्यमिषें मी व्यापिन या जगताला ! ॥
मत्कार्य नियत तें दे करुं मज जगतांत, ।
श्री सरस्वतीच्या मंगल दरबारांत ! ॥
ईशाची इच्छा-देशि न जरि तिज मान ।
अडकेल तरी तव तुझ्याच पाशीं मान ॥

——

## ११८ काल आणि नदी

( कविः—पद्मविहारी )

[ एका इंग्रजी कवितेवरून ]

वाहे ही सरिता अखंड भुवनीं धांवें तसा कालही।
पर्वा त्यां न कुणाचि; ठाउक परी कर्तव्यता एक ही ! ॥
अज्ञेयींच पदीं सदा क्रमिति जे निःशब्दतेनें पथा।
ते केव्हां नच थांबती धनबलें वा आर्जवें प्रार्थितां ! ॥
होतां नष्ट अनंतमार्गगमनीं अस्तित्व तें आठवे।
माघारीं जल घा न तो दिवस ही ईशासही आणवे ! ॥
घेई ठाव नदी-प्रवाह उदरीं रत्नाकराच्या पहा।
एकैक क्षण दग्ध होय उदरीं कालोदधीच्या महा. ॥
आहे येथवरी तयांत जरिही सादृश्य तें सर्वथा।
तत्रापी सुविचारसुज्ञहृदया ही आढळे भिन्नता— ॥
नाहीं व्यर्थ जलौघ वाहत परी ज्या जाइ भूमींतुनीं।
ती भूमी अखिला सुमें फलभरें राहे कशी हांसुनी ! ॥
सौख्यानंद जनांत पुण्य-सरिता ठेवी सदा ही; परी—।
ठेवी काल कठोर भीषण पहा उद्विग्नतेचे गिरी ! ॥

---

## ११९. स्पष्टोक्तीचे अभंग

( कवि:— -वि. ल. गोखले )

वरी रूप दावी सदाचरणाचे । परी कुकर्माचें अंतरंग ॥
गोड गोड बोले साधायासी स्वार्थ । कधीं न अन्यार्थ बोल काढी ॥
निखंदोनि अन्यां वाहे निज तोरा । त्याचा जन्म सारा व्यर्थ व्यर्थ ॥
विसु म्हणे द्यावें पर्वतावरूनी । लोटूनी तयासि खोऱ्यांमाजीं ॥ १

धनाढ्यासी सर्व जन चाहतातीं । तया वर्णितातीं जरि तो दुर्गुणी ॥
एक धनावांचोनि न अन्य गुण । वदतातीं खाण सद्गुणांची ॥
कितीही तयानें चौर्यकर्म केलें । जन सारा बोले ' मस्करी ' ही ॥
विसु म्हणे, झाला उद्धटांचा बाप । तरी नच पाप तयालागीं ॥ २

तयाचे सेवक नानाविध लोक । नसे त्या आणीक वाण कांहीं ॥
गरीब बापुडीं दुःखि लोळतातीं । तयांलागिं प्रीती कोण दावी ॥
गरीब बिचारा जरि हा निरिच्छ । तरि ठरे नीच जगामाजीं ॥
विसु म्हणे, नाहीं कवडि जयासी । कोण मानि त्यासी संसारीं या॥३

अन्यायी जगाची अशीच रहाटी । इथें दीनांसाठीं कोणी नाहीं ॥
तयांसंगें कोणीं नच बोले गोड । संसाराचा वीट येई त्यांते ॥
रंक आणि राव देवासी सारखे । परि हो पारखे येथें दीन ॥
विसु विनवितो तुला देवराया । देई या समयां दीनां धैर्य ॥ ४

———

# १२० वेड्याची विनंती

( कवि:--- श्री. गोपाळ नात्या लाटकर )

( चाल:-वाटे स्मशान-कै. गोविंदाग्रज )

हर हर, हर हर ' बोल बोलतो । खालीं व ती वेडा बघतो ॥
'खैर करी देवा ' हें वदतो ॥
दुःखी वेडा । अर्धा उघडा । फिरतो आगोआग ॥ १

निरखुनि पाहे चहूंकडे तो । क्षणांत हंसतो क्षणांत रडतो ।
क्षणीं रुष्ट होऊन म्हणतो ॥
वेडा मी कां ? । देतां दुःखा । सोडा मजला वाट ॥ २

काय मला जग वेडा म्हणतें । कळे न मुळिही या लोकांतें ।
पुढें धांवतां येति मागुतें ।
कटू बोलतां । खडे मारितां । ते येती पुढतां. ॥ ३

करूं नये तें हें जग करितें । देखाव्याला सहजचि भुलतें ।
शुद्ध मनाला सदा जाळितें ॥
विचार कांहीं । जनांसि नाहीं । जग वेडें सारें ॥ ४

मोहक भाषण पुढती करितें । उलटी करणी करुनि दावितें ।
विषयवासना गोड वाटते ॥
स्वार्थ तयांना । मुख्य भावना । माणुसकी कोठें ? ॥ ५

असोत जन हे कसे तरीही । मला जरूरी यांची नाहीं ।
रूढीला मी तुडविन पायीं ॥
स्वातंत्र्यास्तव । सत्य सुखास्तव । बंडखोर होणार ॥ ६

प्रभो चालवी सूत्र भरारा । विटलों आतां या संसारा ।
देइ कृपेची नांव किंकरा ॥
जात ही घडी । स्फूर्ती धाडी । हीच मागणी आज ॥ ७

---

## १२१ प्रेम

( कवि:—श्री. पुरुषोत्तम विश्वनाथ रहाळकर )

"All other pleasures are not worth is ( Loves ) pains"
Emurson.

प्रेमाकृष्ट जिवास हाय ! विरहीं वाटे नको जीवन ।
प्रीतीच्या उदकाविणें तळमळे तो मीन रात्रंदिन ॥

प्रीतीची हृदयीं नवी मृदु लता जातांच कोमेजुनी ।
विश्वाची रमणीय बाग फुलली उध्वस्त होई क्षणीं ॥

शोकाचे कढ अंतरीं उफळले श्रीराघवाच्या यदा ।
पाषाणा अनिवार पाझर फुटे कारुण्यभावें तदा ! ॥

प्रीतीची चपला सहर्ष हृदयीं झेलूनियां चुम्बिली ।
रोमीओ अणि जूलिएट जगता हीं पारखीं जाहलीं ! ॥

प्रीतीचा पथ घोर दुस्तर असा कां ठेविला ईश्वरें ! ।
आहे अर्थ तयांत काय वसला ठावें कुणाला बरें ! ॥

प्रीतीचाच गुलाब हाय ! परि त्या कांटे असावेत ना ! ।
प्रीतीच्या चषकीं विषा मिसळिलें कां हें न ठावें कुणा ! ॥

*   *   *

प्रेमोद्भूत अशाहि दुःखि वसतो अत्यंत कीं गोडवा ! ।
त्याचीं अन्य सुखा नये सर मुळीं विश्वान्तरीं केधवां ! ॥

---

## १२२ तो क्षण !

( कविः—श्री. वा. निफाडकर )

लज्जा भीति नवोर्मि त्या विरुनिया गेल्या मनःसागरीं ।
घे रूपा सुखशांतिदायक अहो सत्प्रेम तें सत्वरीं ॥
सौख्याची लयलूट चालत असे, हृत्प्रेमसंवर्धन ।
बोला मी विसरूं कसा अहह ! तो हृत्सौख्यदायी क्षण. ॥

*           *           *           *

प्रेमोद्यान फुले, तयांत रमला हा जीव वेडयापरी ।
सद्भाग्यें सुखसागरीं पहुडला भीती नसे अंतरीं ॥
होतां अप्रियसा प्रियाविरह तो, निर्माल्यवज्जीवन ।
हा ! हा ! मी विसरूं कसा असह तो हृत्सौख्यहारी क्षण ॥

---

## १२३ दुर्दैवी–कळ्या

( कविः—श्री. धों. त्र्यं. कोचरगांवकर )

वेलींच्या वरती कळ्या बहरल्या, भृंगांसवें रंगल्या ।
सौगंधें भरल्या दिशा न झणिं तों झंझानिलें गांठिल्या ! ॥
हातीं कुस्करिल्या ! पदीं तुडविल्या ! मातींत हा ! झोकिल्या ! ।
दुष्टें निर्दळिल्या ! कळ्या न, विधवा भूलोकिंच्या बोलिल्या ! ॥

---

# भाग १३ वा

## विविध

—×—

### १२४ स्वधर्म

( कविः—श्री. पां. गं. लिमये )

( बिभास )

राहि न मीन घृतीं पळही ॥
सोडुनि माता बाल न राही ॥
घे जरि त्या राही ॥ ध्रु० ॥

तोय जेविं मीना । हाय माय बाला ।
स्वीय धर्म मनुजांही ॥ १ ॥

——— ———

### १२५ विनवणी

( कविः—श्री. धों. त्र्यं. कोचरगांवकर. )

( गझल–मेरे मौला बुलाला मदीने मुझे० )

कसी येइ दया न दयाळा ! तुला ? ।
ऐकूं न ये कां भारत–हांक तुला ? ॥ ध्रु० ।

सौख्यशांती, दिव्यभूती कधिंच नाशा पावली ॥
भारताची भाग्यलक्ष्मी काळडोहीं लोपली ।
धांवे ! दीन गजेन्द्र बा ! वाहिं तुला ॥ १

विश्वराज्ञी हिंदभूमी हाय ! दासी जाहली ।
मानहानी होउनीयां आपदांनीं गांजली ।
तारी ! तारी ! मुरारि ! ह्या द्रौपदीला ॥ २

राज्य गेलें ! दैन्य आलें ! दुर्दशा ना सोसवे ! ।
प्राण कंठीं येउनीयां वाहतीं बा ! आसवें ।
नुपजे केवि करुणा कृपाळा ! तुला ? ॥ ३

---

## १२८ मन

( कवि:—श्री. पां. गं. लिमये)

चेता अमिता स्वैरिता; ।
गमत कूर्मसम मंद पवनजव ! ॥
वघतां मानस-लोलता ॥ ध्रु० ॥

दे न विवेका सहसा थारा ।
सहज होय वश भिन्न विकारां ॥
प्रकृतिकुटिल अविरत कुपथीं रत ।
ये नच या सुविनीतता ॥ १

---

## १२७ "भारत--प्रभात"

( कविः—श्री. दत्तात्रय धोंडदेव देशमुख, बी. ए. )

भारतवर्षा ! ऊठ झडकरी, सोडि आळसाला, ।
प्रभात होऊनि मित्र पहा हा उदयाचलिं आला. ॥
मित्राचीं सोज्वल तीं किरणें हात जणूं गमतीं ।
गवाक्षांतुनी आळशांस तीं उठवाया येती. ॥
मित्रापरि हा मित्र पहा किति प्रेमी जगिं वाटे ।
झटतो मित्रहिताकरितां हृदिं म्हणुनि मोद दाटे ॥
कशी आवडे निशाकाळची घोर शांति तुजला ।
भारतवर्षा ! ऊठ झडकरि, सोडि आळसाला ॥ १

* * * *

ऐश्वर्याचीं निजसौख्याचीं आठविसी स्वप्नें ।
उगाच पडुडसि अंथरुणावरि सौख्यालस्यानें ॥
मनीं चिंतिसी खरोखरीचीं व्हावीं तीं स्वप्नें, ।
परि तुज न कळे कशि होतिल तीं ऐशा स्वस्थपणें ॥
दिनाधीश हा नभिं वरि येई, उद्योगा लाग ।
ऊठ झडकरी परत वैभवा मिळवि महाभाग ! ॥
पूर्वदिशींचा पहा दिनमणी उठवि जपानाला ।
भारतवर्षा ! ऊठ झडकरी, सोडि आळसाला. २

पाश्चात्यांची प्रगति पाहि तूं किती पुढें जाई, ।
आकाशाचा पाताळाचा ठाव घेउं पाही ॥
पुराणगत तव नवलपरीच्या अतां सर्व गोष्टी; ।
निज नेत्रांनीं पाहत, केवळ नवल करित बससी. ॥
ज्या विद्यासामर्थ्यें स्वोन्नति तीं राष्ट्रें करिती ।
त्या विद्येचें अवलंबन तूं करीं अतां पुढतीं. ॥
स्वतंत्रतेच्या आत्मविश्वसित लागे मार्गाला ।
भारतवर्षा ! ऊठ झडकरी, सोडि आळसाला ॥ ३

*　　　*　　　*

मनीं वाहुनी विविध तमोगुणि असुरी आकांक्षा ।
पाश्चिमात्य राष्ट्रें हीं झुंजति, छळिति जीवलोकां ॥
विद्यासंस्कृतिमुखकमलांना लावुनि काळोखी ।
परस्परांचें शोणित शोधुनि आत्मा करिति सुखी ॥
विद्यासंस्कृति उच्चध्येयीं साध्य करीं आतां ।
नच परि अनुकरि तिळभर पापी पाश्चिमात्य राष्ट्रां ॥
अखिल जगाला निज चातुर्यें शिक्षित करण्याला ।
भारतवर्षा ! ऊठ झडकरी, सोडि आळसाला. ॥ ४



## १२८ कलिका.

[ कविः—श्री. मोरेश्वर रामचंद्र जोशी ]

हा ! कलिका तोडिली ! ।
वेलीवर जी भली विलसली ॥ ध्रु० ॥
नयन-मनोहर नाजुक कलिका ।
बघतां बघतां ही कोमेजली. ॥ १
रंग हिचा हा जाइ लयातें ।
जाइल सुकुनी आणि मजजवळी. ॥ २
सौख्य-क्षण ते जाती निघुनी ।
न कळत जैसे अल्पचि कालीं ! ॥ ३
वेलीवर जरि राहूं देतों ।
सुखदायक ही असती झाली ! ॥ ४
रम्योद्यानीं परिमल हीचा ।
दरवळता कीं फुलतेवेळीं. ॥ ५
अपक्व तरि म्यां अदयें खुडिली, ।
विटली, सुकली, गेली, गेली ! ॥ ६

———

## १२९ समत्व

( कविः—श्री. पां. गं. लिमये )

विच-कुलां नर पाही ।

सारे सम हरिगेहीं ॥ ध्रु० ॥

भूप गोप हा भेद नराला । तुल्य गणी प्रभु दोहिं ॥ १

विप्रचि म्हणुनी प्रीत न होई । त्याज्य अंत्यजहि नाहिं ॥ २

प्राणिगणांचा प्रभु कैवारी । योगक्षेमा वाहि ॥ ३

---

## १३० निद्रेप्रत गाणें.

( कविः—मोरेश्वर )

[ चाल—धिन्ना धिन्ना धिन्नक् धिन्. ]

ये, निद्रे ! ये, लवकर ये, ।
अंत पहासी किति सदये ? ॥ ध्रु० ॥

तूं दुःखातें शमवीशी, ।
तूं चित्तातें शांतविशी ॥
तूं श्रमकष्टां दूरविशी, ।
मन तें उल्हासित करिशी; ॥

तूं गरिबांची सुख-राशी, ।
बंधस्थितिही विसरविशी, ॥
भेद न कसला तुजपाशीं, ।
तूं सकलांना सुख देशी ! ॥ १

आरोग्याची तूं जननी, ।
शक्ति-ज्ञानाची खाणी, ॥
सखी, गडे, तूं शांतीची, ।
ठेवच तूं आनंदाची; ॥
राणी साऱ्या जगताची ।
दिव्य देणगी देवाची, ॥
वाट पाहतों तुझी तरी, ।
येउनि मजला शांत करी ॥ २

झडकरि निद्रे, ये, ये, ये, ! ।
चिंता हरण्या मनिंचि सये ! ॥
मृदु शय्या अन् एकांत, ।
असुनिहि बघसी किति अंत ? ॥
मना निराशा जी जाची ।
समर्थ हरण्या ती तूंची ! ॥
म्हणुनी निद्रे ! लवकर ये, ।
सुखवायातें मज सदये ! ॥ ३



## १३१ वेष.

( कवि:—श्री. पां. गं. लिमये )

( मारवा )

भस्म वासना, तरी यथार्था भस्मचर्चा।
अक्षमा-विनाशीं सार्थ अक्षमाला॥ ध्रु०॥
विरक्तता हे रक्तवसन तें।
यतिवृत्ती प्रथमा। वृथा वेषचि माना॥ १

## १३२ फुलांची माळ.

( कवि:— श्री. केशव श्रीपाद कानेटकर )

माले! मीं तुजला किती कितितरी प्रेमादरें घेतलें!।
घेवोनी क्षण एक पूर्ण फुलण्या दूरीं जरा ठेविलें,॥
तों कोणीं मम दृष्टि ते तुजवरी नाहीं, असें पाहुनी,—।
–छेः नोहे, तुझिया वरील नच मद्दृष्टी तया साहुनी,॥–
तूंते नेउनि ईशपावनपदीं सद्भक्तिनें वाहिलें,।
निर्माल्यस्थितिला क्षणैक कृतिनें कैसें तुला आणिलें!॥
ईशाच्या चरणांवरील जरि तूं हृन्मंदिरीं माझिया।
बैसाया उचिता खुलीव हृदया त्वत्सद्गुणा गावया.॥

## १३३ ही कोण?

( कविः—वि. ल. गोखले )

मोठे वीर, समग्र थोर नरही सर्वस्व सोडोनिया, ।
सत्ता, वैभव, सर्वही गमवुनी, कंगाल होवोनिया, ॥
देवोनी निज आहुती, जिस गृहीं आणावया सज्जले, ।
ऐसी ही सखि सांग कोण कुठली, जी ना कधीं मावळे ! ॥
लाखों नारिनरां तिच्यास्तव यमें स्वर्गांत धाडीयलें; ।
तैसें संत महंत मार्गि अपुल्या केले तिनें ते ढिले ! ॥
कित्येकां उलटें तिनें कुपथ कीं सोडावया लाविलें; ।
ऐसी ही सखि सांग कोण कुठली, जी ना कधीं मावळे ! ॥
कैसें रूप तिचें, कशी विचरते, ठावेंहि ना अल्पसें; ।
कोठें वास ? तिचा सुवास परि त्या कस्तूरिलाही नसे ! ॥
निद्रा ना तिजसी, समुद्रहि तिच्याहूनी उणा विक्रमीं; ।
ऐसी ही सखि सांग कोण कुठली, तेजस्वि जी नेहमीं ! ॥
नाहीं येतच कां तुझ्या मनिं सती देवी तशी निर्मला ? ।
'सत्कीर्ती 'विण कोण अन्य जगतीं बाला अशी मंगला ? ॥



## १३४ निराशेच्या शैल शिखरावर.

( कविः— दत्तात्रय धोंडदेव देशमुख, बी. ए. )

रम्य उपवनीं निराश बनुनी भटकत असतांना, ।
तीक्ष्ण शरांनीं तेंवि असौख्यीं विव्हल होतांना, ॥
कोकिल पक्षी मंजुरवानें तानांवर ताना ।
घेतांना मन निराशपंकीं अधिकचि रुततांना, ॥

काय करावें कांहिं सुचेना मनहि आवरेना; ।
दुःखसागरीं कीं सुखगिरिवरि निश्चल होईना, ॥
कर्णपथावरि कोमल ताना त्या आदळतांना ।
अधोवदन जरि मुख उचलुनि वरि कोकिळ बघतांना. ॥
हसत मुखानें गुलाब-कलिका हसवी सकलांना ।
स्वपदिं क्षणभरि ती बद्ध करी मदीय नयनांना ॥
खालीं वरतीं मागें पुढतीं कंटक चोंहिकडे ।
वावरतांना जरि भय दाविति तरि ती कां न रडे ॥
गुलाबि कोडें उलगडतांना मन आश्चर्यभरें ।
थक्क होउनी भान तयाचें त्यासी कांहिं नुरे. ॥
विचार जों हे कलिकेविषयीं मन्मनिं येताती, ।
कोकिल-ताना मम कष्टि-मना अधिकचि आळविती. ॥
स्नेहभरानें आतुरतेनें जोंवरि वरि पाहीं, ।
मेघाच्छादित आकाशामधिं दृष्टि उडी घेई. ॥
मेघावरती मेघ आदळुनि गडगडाट होई; ।
भीतीचें पुट एकावरतीं एक चढत जाई. ॥
परि ती चपला आनंदानें खेळत असतांना ।
चमकत लचकत निज तेजानें हर्षवि मनुज-मना. ॥
मेघश्यामा ! निराश होसी ! कां नयनिं न येतें ।
हें ललनात्रय संकटार्णवीं आनंदें डुलतें ॥
गुलाब-कलिका पीडित असतां हसवी सकलांना; ।
मधुर कोकिला भयदायक निशिं रमवी मनुजांना; ॥
स्वानंदें सौदामिनि चमके, नाचे आकाशीं ।
मेघश्यामा ! निराश होसी मनास कष्टविसी ! ॥

---

## १३५ निराशेचा सूर.

( कविः—मञ्जुमाधव )

[ निराश जीवाला सगळीकडे निराशाच दिसणार ! ]

वेडयाचें वेडें गीत । नैराश्याचें संगीत ।
मम जीवाचे हे बोल । म्हणोत कोणी त्या फोल ॥
जगताचें हें मैदान । भीषणतेचें कीं स्थान ।
स्मशान उडत्या आशेचें । मेलेल्या आनंदाचें ॥
रात्रीची ही विश्रांती । भयाण दिवसाच्या अंतीं ।
परि प्रभातीं तो सूर । नैराश्याचा भेसूर ॥
' सृष्टीचें मंजुल गान ' । म्हणती कवि त्या बेभान ।
त्या न लागला हा थांग । दुर्दैवाचें रणशिंग ॥
मलाच दिसती पुष्पाचे । रंग आंतले हृदयाचे ।
हसती नच, जगता कथिती । भ्रमरांची स्वार्थी रीती ॥
गडगडाट नच मेघांचा । तडफडाट तद् हृदयांचा ।
भिरभिर वेडे हे फिरती । मुकल्या प्रेमास्तव रडती ॥
काळोखी काळी रात । काढुनी रडुनी दुःखांत ।
मधेंच दचके भ्रमांत ती । चंचल चपला त्या वदती ॥
पूर्ण चंद्र जें नभांगणीं । किती भोंवतीं नव तरुणी ।
परी मुखावर नच नाचे । सरल हास्य नव तेजाचें ॥
चंद्र न येई जधीं घरा । बेछूट नटल्या ह्या तारा ।
ही जगताची कां रीती । सतिधर्माची उफराटी ? ॥
भानु शोधितो रजनीला । निज हृदयाच्या राणीला ।
आशेची सरतां खोली । घेइ उडी क्षितिजाखालीं ॥

सृष्टीचे वेडेपीर । मी ना कवि त्यां म्हणणार ।
गाणें गाती पवनाचें । दुःखपूर्ण निःश्वासाचें ॥

अरुणाची चढती ज्योती । संध्या देवीची दूती ।
जन्म न भासे, मरणाची । प्रथम पायरी चढण्याची ॥

निर्झर गाती गानाला ।-गाणें कसलें ?-रुदनाला ।
कितीक फुलती फुलवेली । दो दिवसांची परि बोली ॥

अंतीं एकच शाश्वतता । नैराश्याची सुमनलता ।
अश्रूचें फुलतें फूल । चुकले मुकले मम बोल ॥

---

## १३६ दान

( कविः—श्री. पां. गं. लिमये )

दानासम लोकीं पुण्य ना ।
नच अदेय कांहीं सज्जनां ॥ ध्रु० ॥

दे कर्ण निजा त्वचा प्रमोदें । मांसा शिबिराजा ।
दे बलि वसुधा, दधींचि विबुधां । अर्पी निज अस्थींना ॥१

अल्पांतुनि ही अल्प देइ तूं, प्रेमळ हो दीनां ।
मधुकर-मधुची कृपणधनाची । होई गति न अभिन्ना ॥ २

उच्चा स्थिति हो प्राप्त पयोदा । हीन पयोधीला ।
होई, धन्या जोडीं पुण्या । धर्म करोनी अधनां ॥ ३

## १३७ प्रेमाची महती

( कविः—रा. ब. दा. ग. पाध्ये )

गगनिं चमकती अमित तारका तरि न अंधता जाई; ।
एकच रविच्या उदयिं सर्व ही सृष्टी उज्ज्वल होई —
जातां तो अस्ता । येई मृत्युकळा जगता ॥ १

मनुज मतिंत ही अमित कल्पना-विचार लखलखताती; ।
प्रेमज्योति एकच परि दे न विझे ऐशी दीप्ती; ।
अविदित ती ज्यातें । जीवित मरणच जगिं त्यातें ॥ २

प्रणयिजनांच्या सुखदुःखाचे अश्रू गालांवरचे ।
एकवटुनि, जरि, गगन नवें कुणि रचिलें नव तेजाचें ।
उरेल मग तेथें । रविशशि कारण-लव हि न तें ॥ ३

प्रणयी जन मन परस्परांचें ज्या ज्या आनंदांनीं ।
प्रफुल्ल करिती, रचिल तयांचा सागर जगिं जरि कोणी ।
अविरत मग भरती । रत्नमयी त्या येइल ता ॥ ४

———

## ११८ कविदर्शनानंद !

( कविः—नाथ निफाडकर )

अति दिव्य, मला, आनंद होतसे कवि-आत्मे पाहून ॥ध्रु०॥
कूजनें संगीत गाती ।
विश्व-झोले विहरताती ।
कुणि ओहोळांचीं गूढगुंजनें दावितातिउकलून ! ॥ १ ॥
तारकांच्या मूक गाना ।
देति कोणी हृदयवीणा ।
सति पश्चिम-वैधव्यानें जाती कांहीं कवि विवळून ॥ २ ॥
मानवांच्या सर्व वृत्ती ।
रागदारीनेंहि गाती ।
कुणि विनोदलहरी देती गालीं कवनांनीं वठवून ॥ ३ ॥
बालकांचीं गोड हास्यें ।
विहगसम तीं चारु नृत्यें ।
किति किती कवींना गीत-समाधी देताती लावून ! ॥ ४ ॥
दाविती शृंगार राजा ।
नवरसांचा खचित साचा; ।
कुणि पवित्रता बघतात तयांची मोहिनि-नयनांतून ॥ ५ ॥
विश्व सारें नाचरें हें; ।
यांत सारा मोह आहे; ।
ही रसात्मका वृत्तीच कुणाची टाकितसे गुंगून ॥ ६ ॥

जाळि कोणां शोकवन्ही ।
हृदय त्यांचें जाइ उलुनी ।
कुणि समाज—अन्यायानें जाती अंतरिं होरपळून ॥ ७ ॥

कोणि रीती कोणि नीती ।
कोणि माया वर्णितातीं ।
परि कुणी न जाती परमेशासी मुळींच कीं विसरून ! ॥ ८

मायदेशासाठिं सारे ।
येथ आले झगडणारे; ।
अशि नव प्रभा नव युगास जाई फारच ही शोभून ! ॥ ९

" येथ नाहीं भेद काहीं; ।
माय ही आनंददायी !" ।
हें जगद्धात्रि पावित्र्यभूमिचें कविबाळांचें गान ! ॥ १०



समाप्त.